# संगीत

# ' पाहुणा '

लेखक—श्री. अ. ह. गद्रे

[ स्वराज्यसुंदरी, वीरकुमारी, माझा देश, भवानी तलवार, कर्दनकाळ, मूर्तिमंत सैतान, आर्य महिला या नाटकांचे नि प्रेमदेवता, पूर्ण स्वातंत्र्य, घटस्फोट, कुमारी १९३१, आई, तरुण पिढी, प्रीतिविवाह, मुलींचं कॉलेज, पुणेरी जोडा या नाटिकांचे कर्ते ]

२ एप्रिल १९४३

मूल्य १ रुपया

# न गणा, पाहुणा !

'माना कीं न माना, मी तुमचा पाहुणा' या अर्थाची हिंदी भाषेंतील म्हण सुप्रसिद्धच आहे. महाराष्ट्रीय रसिकांना मी इतकेंच सांगतों कीं, तुमच्या भेटीस येत असलेला हा माझा पाहुणा तसल्या प्रकारचा नाहीं. त्याची ओळख तुम्हांला तत्काल पटेलच, पण त्याचबरोबर त्याचा जनक जो मी त्याची आणि तुमची ओळख तर 'चांगलीच' आहे.

१९३० ते १९३३ पर्यंतच्या तीन वर्षांत मी नवीनच प्रवर्तित केलेल्या विशिष्ट प्रकारच्या नाटिकासंप्रदायाच्या द्वारें मराठी रंगभूमीची यथाशक्य सेवा केली, आणि नाट्यदेवतेला नाटिकांचा नवरत्नहार समर्पण केला. माझ्या सेवेचें संकुलित स्वरूप जनतेच्या डोळ्यांपुढें असावें म्हणून मीं सुमारें वर्षापूर्वी नऊ नाटिकांचा संग्रहहि प्रसिद्ध केला.

नऊ नाटिका लिहिल्यानंतरच्या गेल्या दहा वर्षांच्या काळांत मीं कोणतेंहि नाटक किंवा नाटिका लिहिली नाहीं. गेल्या वर्षी बालमोहन सं. मंडळीसाठीं मीं 'माझें घर' हें नाटक लिहावयास घेतलें होतें, पण तें माझ्या हातून पुरें लिहून झालें नाहीं.

त्यानंतर येथें नवीनच स्थापन झालेल्या आदर्श नाट्यालयाच्या धन्यांच्या वतीनें नटवर्य श्री. कृष्णराव चोणकरांनीं दीड महिन्यापूर्वी माझी भेट घेतली आणि आपल्या संस्थेचें नाट्यसेवेचें ध्येय उच्च असल्याचें मला पटवून दिलें. नाट्यकलेच्या पुनरुज्जीवनाच्या उद्योगाला आपल्या हातून होईल तितकें सहाय्य होत जावें अशी माझी नित्याचीच मनीषा असल्यामुळें, मी लगेच 'पाहुणा' हें नाटक लिहावयास घेतलें, आणि आज त्याचा पहिला प्रयोगहि रसिकांपुढें होत आहे. अर्थात् या नाट्यालयाच्या त्रिवर्ग धन्यांचे आभार मानणें हें माझें कर्तव्यच होय.

या नाटकांत मी जें ग्रामोद्धारक स्वयंसेवकाचें चित्र रेखाटलें आहे तें वास्तववादीच आहे हें, आपल्या इकडील खेडेगांवांची ज्यांना प्रत्यक्ष ओळख आहे त्यांना तरी सांगावयास नकोच.

हल्लीं नाट्यकलेला जें दीन स्वरूप प्राप्त झालेलें दिसत आहे, त्याचें माझ्या मतानें जें प्रमुख कारण आहे तें म्हणजे योग्य परिश्रमांचा अभाव हें होय. 'ठोकून देतों ऐसाजे' असल्या पद्धतीनें नाट्यकलेला कधींच ऊर्जितावस्था येणार नाहीं. ज्या काळीं मराठी नाट्यकला वैभवाच्या उच्च शिखरावर आरूढ झाली होती त्या काळींहि तिला तें वैभव प्राप्त होण्यास नाट्यसेवकांचे कमालीचे परिश्रमच कारणीभूत झाले होते. आज श्री. मो. ग. रांगणेकर आणि श्री. पार्श्वनाथपंत आळतेकर या दोघांचे परिश्रम नाट्यकलेला पुनः वैभवाचे सुदिन प्राप्त करून देण्यास सहाय्यभूत होत आहेत हें मी अभिनंदनपूर्वक मान्य करतों; आणि आदर्श नाट्यालयाच्या संस्थापकांस अशीहि विनंति करतों कीं, तुम्ही स्वार्थत्यागपूर्वक नवी संस्था चालू केलीच आहे तेव्हां प्रयत्नांची आणि परिश्रमांची शर्थ करून दाखवा आणि रसिकांचे धन्यवाद घ्या.

पाहुणा नाटकाच्या प्रथम प्रयोगाच्या वेळीं मला माझ्या दोन दिवंगत बंधुतुल्य मित्रांची विशेष आठवण होते. ज्येष्ठ बंधुतुल्य माझे मित्र नाट्यतपस्वी य. ना. तथा अप्पाराव टिपणीस यांचें नुकतेंच शोचनीय निधन झालें आणि म्हणून मी त्यांच्या प्रोत्साहनाला मुकलों आहें. त्याचप्रमाणें ज्यांनीं आपल्या प्रसिद्धीकरण-पटुत्वानें माझ्या नाटिकासंप्रदायाला दहा वर्षांपूर्वी अपूर्व असें सहाय्य केलें होतें ते माझे कनिष्ठ बंधुतुल्य मित्र श्री. भाई सामंत यांच्या शोचनीय निधनानेंहि माझें मन व्यथित होत आहे. ते जिवंत असते तर......पण या आठवणी करून मला हेंच सांगावयाचें आहे कीं, अशीं कमालीचे परिश्रम करणारीं माणसें आज दिसत नाहींत.





'पाहुणा' नाटक लिहून घेणारे 'आदर्श नाट्यालया'चे धनी श्री. भालचंद्रपंत नि वसंतराव शंकरशेट व कृष्णराव चोणकर आणि

तें परिश्रमपूर्वक बसविणारे माझे मित्र श्री. नानाराव अभ्यंकर, तसेंच पुस्तक उत्कृष्ट रीतीनें अत्यल्पावधींत छापून देणारे माझे मित्र श्री. बाबूराव सापळे आणि प्रयोगांत कामें करणारी नट, नटी नि इतर साथीदार मंडळी, खेरीज संगीत-दिग्दर्शक श्री. भाटकर इत्यादींचेहि मी सानंद आभार मानतों.

आज मी फक्त दोन मित्रांचेच तेवढे आभार मानीत नाहीं. ते म्हणजे श्री. पुरुषोत्तमपंत सामंत नि गोविंदराव घाणेकर हे होत. कां तें पुढें केव्हांतरी सांगेनच !

' निर्भीड ' कार्यालय,<br>
मुंबई क्र. ४<br>
दि. २–४–४३

नाट्यरसिकांचा सेवक,<br>
**अनंत हरि गद्रे**

'पाहुणा' या नाटकाचा प्रथम प्रयोग मुंबई येथील बालीवाला नाटकगृहांत दि. २-४-४३ रोजीं रात्रौ झाला. त्या प्रयोगांत ज्यांनीं भूमिका केल्या व प्रयोगाला ज्यांनीं अन्य रीतीनें प्रत्यक्ष साथ दिली त्यांचीं नांवें पुढें देत आहोंत—

## — पुरुष भूमिका —

सुहास ... ... ... श्री. कृष्णराव चोणकर
माधवराव ... ... ... ,, वाय्. जी. टकले
भोलाराम ... ... ... ,, व्ही. जोगळेकर
चटपटे ... ... ... ,, के. शेटे
गुंडोपंत ... ... ... ,, डी. आंग्रे
भैरू ... ... ... ,, गणपतराव फडके
जमादार ... .... ... ,, राम आंबेस्कर, बी. ए.
नोंदणीदार ... ... ... ,, हरिभाऊ जोशी
पोलीस ... ... .... ,, सहदेव घोगळे

## — स्त्री भूमिका —

सुलभा ... ... कु. ललिता परुळकर
राधाबाई ... ... सौ. नलिनी नागपूरकर, जी. ए.
मधुअक्का ... ... श्री. केसरबाई बांदोडकर
रंगू ... ... श्री. लीला शिंदे
सिंधु ... ... कु. बेबी चोणकर

संगीतदिग्दर्शक—श्री. व्ही. जी. भाटकर, तबला—श्री. रघुनाथ मोरे,

ऑर्गन—श्री. बाबूराव बोरकर, सारंगी—नूरबक्ष,
खैराबीखां, अमीरखां मौलाबक्ष.

व्यवस्थापक—श्री. भालचंद्र शंकरशेट, बी ए.; वसंतराव शंकरशेट.

# ‘ पा हु णा ’

## १

[ रावसाहेब माधवराव यांचें निवासस्थान. थाटाचा बंगला. आधुनिक पद्धतीची सजावट. सुमारें वीस–एकवीस वर्षांची त्यांची एकुलती एक कन्या सुलभा पेटी वाजवून गाणें म्हणत आहे. एका बाजूला ५०–५५ वर्षें वयाचे भोलाराम मास्तर बसले असून दुसऱ्या बाजूला कोंच रिकामें दिसतें. गाणें चालू झाल्यावर माधवरावांची पत्नी मथुअक्का श्रीकृष्णाची एक तसबीर घेऊन येतात व ती खिळ्याला अडकवून तिला हार घालतात. माधवराव अजून आले नाहींत असें पाहून मथुअक्का आंत जातात नि पतिराजांना आणून कोंचावर बसवितात–आणि स्वतः जवळ बसतात. ]

### प्रार्थनागीत

सुलभा— [ राग–मिश्र काफी–ताल–त्रिताल ]

**श्रीहरि हरि हरि गाई वाचे ।**
**हरिनाम हरी दुःख भवाचें ॥ ध्रु० ॥**
**मनुज नामीं, जरि रत झाला ।**
**नुरतें संकट इहलोकींचें ॥ १ ॥**

**मथुअक्का :** ( गाणें संपल्यावर ) ये, बैस बाळ इथं. आज मला तुझी दृष्टच काढली पाहिजे. मास्तर, आज सुलभेनं अगदीं गोड गळ्यानं गोड गोड गाणं म्हटलं, नाहीं का ?

**भोलाराम :** तें काय विचारावं अक्कासाहेब ! देवाचं गाणं आधींच गोड आणि त्यांत तें सुलभेच्या गोड गळ्यांतून निघालं, मग त्याची गोडी वाढली तर नवल काय ? अक्कासाहेब, आज तुम्ही बाळ सुलभची दृष्ट काढाच. आज सुलभच्या मुखावर चंद्रमाच झळकतो आहे जसा कांहीं ! अक्कासाहेब...

**माधव० :** मास्तर, आजपासून हिला नुसतं अक्का म्हणा ! पाहिजे तर हिला अक्काबाई, अक्काआई किंवा अक्काआजी म्हणा !

**भोला० :** मथुअक्का पूर्वी अक्का होत्या, सुलभच्या जन्मानंतर त्या अक्काआई झाल्या पण त्या अक्काआजी केव्हां होणार तें मात्र नक्की सांगतां येत नाहीं. ही गोष्ट तुमच्याच हातीं आहे. सुलभचं लग्न होऊं द्या कीं, वर्षांत पाळणा हालूं लागेल आणि अक्काहि आजी होतील. हो ना ग सुलभ ?

**सुलभा :** मास्तर, या असल्या गोष्टींवांचून कांहीं अडलं का आहे ? जेव्हां तेव्हां तुमच्या आपल्या लग्नाच्या गोष्टी ! लग्न, लग्न, लग्न ! होईल वेळ आल्यावर. त्याची एवढी वाटाघाट कशाला हवी ?

**मथु० :** अग, आधीं वाटाघाटी केल्याशिवाय का कुठं लग्नाचा घाट जमणार आहे ? आतां आम्हांला नवरदेवाच्या शोधालाच लागलं पाहिजे.

**सुलभा :** कांहीं नको शोधायला !

**भोला० :** मग काय, तुझा भावि पति एकदम पाहुणा म्हणून इथं आभाळां-तून खालीं पडणार कीं काय ?

**सुलभा :** तसंच कां म्हणा ना ! पण मी आपली जात्येंच कशी ! यंदां माझी बी. ए. ची परीक्षा—मला अभ्यासाला गेलंच पाहिजे. ( जाते. )

**भोला० :** अक्कासाहेब, आतां सुलभच्या लग्नाचं लांबणीवर टाकूं नका. माझा विचार पटतो का तुम्हांला अक्कासाहेब ? अक्कासाहेब, बोलत कां नाहीं ? साहेबांची मुद्रा काय न्याहाळतां ? अक्कासाहेब...

**माधव०** : मास्तर, आतां तुम्हांला कसं सांगूं ? आजपासून हिला नुसतं अक्का म्हणा, तिच्यापुढं साहेब ठेवूं नका !

**भोला०** : कां बरं ? अक्कापुढं साहेब कां नको ?

**माधव०** : ( सचिंत ) मास्तर, काय सांगूं आणि कसं सांगूं ? आमच्यांतला साहेब कायमचा गेला मास्तर !

**मथु०** : असं काय म्हणायचं तें ? काय झालं तरी काय ?

**माधव०** : काय झालं ? आज माझ्या नांवांतला साहेब निघून गेला. आतां मी कालपर्यंतचा रावसाहेब नाहीं, आजपासून मला लोक रावबहादुर म्हणणार ! आज मला साहेबानें—त्या मोठ्या साहेबानें—अगदीं साहेबाच्याहि साहेबानें नव्या वर्षानिमित्त रावबहादुर केलं आहे ना ?

**भोला०** : ही तर चढत्या आनंदाची आणि वाढत्या वैभवाची गोष्ट आहे. रावसाहेबापेक्षां रावबहादुर पदवी अधिक मानाची ! त्यांत खिन्नतेचं कारण कोणतं ?

**मथु०** : तेंच मलाहि समजत नाहीं. आजचा वाढत्या आनंदाचा दिवस ! त्यासाठींच मी सुलभला देवाचं गाणं म्हणायला सांगितलं. तें पाहिलंत का ? श्रीकृष्णाचं चित्र ! त्याला मी मनोभावानं हारसुद्धां घातला. इकडे रावबहादुर पदवी मिळाली, देव पावला !

**माधव०** : देव पावला पण साहेब गमावला ! आतां मी रावसाहेब राहिलों नाहीं. माझ्या नांवांतला साहेब निघून गेला ! माझ्या नांवांतला साहेब निघून गेला म्हणून मास्तर, हिच्या नांवांतल्या साहेबालाहि रजा द्या ! मी जोंपर्यंत रावसाहेब होतों तोंपर्यंत ही अक्कासाहेब होती पण आतां मी रावबहादुर झालों—

**भोला०** : म्हणून पाहिजे तर मी अक्कासाहेबांना अक्काबहादुर करून टाकतों— अक्कासाहेब, हा नांवांतला बदल आहे का तुम्हांला मान्य ?

**मथु०** : इःश ! यांचं आपलं कांहींतरीच ! मला वाटतं, इतक्या लौकर नवी पदवी मिळाली म्हणून इकडचं डोकं बावरलेलं दिसतं ! मास्तर, कशाला हो हे साहेब लोक इतक्या लौकर लौकर पदव्या देतात ते ?

**माधव०** : साहेब लौकर पदव्या देतात म्हणजे कांहीं आमच्यावर उपकार

करीत नाहींत ! तशींच साहेबांचीं कामें करतों आम्ही ! आम्ही कामें करतों, साहेब खूष होतात !

**मथु० :** होय ना ? मग अशा आनंदाच्या प्रसंगीं तोंड आंबट कां करतां ? आतां इतक्यांत भैरू पेढे घेऊन येईल. तो आला कीं...

**भैरू :** ( येऊन ) ह्यो आलों अक्कासाब ! ( तो एका हातांत पुडा नि दुसऱ्या हातांत नांवाची पाटी घेऊन येतो. )

**माधव० :** भैरू, हिला आतां अक्कासाहेब नाहीं म्हणायचं ! आणि हें काय आणलंस ?

**भैरू० :** ह्यी ? ह्यी पाटी नांवाची !

**माधव० :** ( पाटी पाहून ) गेला, या पाटीवरचाहि साहेब गेला ! म्हणे, रावबहादुर माधवराव संतोषे !! ( चटपटे वकील हारतुरे घेऊन येतात व मथुअक्का पाटी घेऊन जातात. भैरूहि जातो. )

**चटपटे :** होय, रावबहादुर माधवराव ! आज साहेबाच्या कृपेनं तुम्ही रावबहादुर झालांत. हा घ्या अभिनंदनाचा हार ! ( हार घालतो. )

**माधव० :** बसा चटपटे ! तुमचा–तसाच साहेब लोकांचा मी फार फार आभारी आहें.

**चटपटे :** आज खरोखरच तुमच्यावर अभिनंदनांचा वर्षाव होतो आहे. वृत्तपत्रांतून अभिनंदन–सभांतून अभिनंदन—

**माधव० :** बरी आठवण केलीत. थोड्या वेळानं मला एका सभेला जायचं आहे !

**चटपटे :** तें ठीकच म्हणा ! तें असो. बरं रावबहादुर माधवरावजी...

**माधव० :** ( स्वतःशींच ) होय, आतां मी रावबहादुर माधवरावच ! मला वाटलं होतं कीं, त्या थोर रावसाहेब माधवरावजी रानड्यांनंतर हा रावसाहेब माधवराव संतोषे अनेक वर्षें रावसाहेब माधवराव म्हणून गाजेल ! पण कुठं आहे तें भाग्य आमच्या कपाळीं ? असो. ( सुस्कारा सोडतो. )

**चटपटे :** रावबहादुर, असे सुस्कारे सोडूं नका. तुमच्या चिंतेचं कारण मला समजतं.

**भोला०** : ( पुटपुटत ) भानगड गल्लींतला भानगडी वकील चटपट्या तूं ! मनकवडाच कीं नाहीं ?

**चटपटे** : रावबहादुर, कोण हो हे ? असे आपल्याशींच काय पुटपुटताहेत ? वेडे तर नाहींत ?

**माधव०** : आहेत जुन्या जमान्यांतले एक पंतोजी ! यांनीं आमच्या सुलभला...

**चटपटे** : म्हणजे आपल्या मुलीला ?

**माधव०** : होय, आमच्या मुलीकडून यांनीं—भोलाराम मास्तरांनीं—श्री गिरवून घेतली.

**भोला०** : म्हणजे फक्त श्रीच बरं का ? श्रीनंतरचा ग कांहीं मला तिला चांगलासा शिकवतां आला नाहीं ! सुलभ मूर्तिमंत श्री आहे, तिला 'ग'ची बाधा........

**चटपटे** : बस् करा तुमचं पुटपुटणं ! कळलं तुमचं अगाध ज्ञान ! धड दोन अक्षरं सुद्धां शिकवतां येत नाहींत........

**माधव०** : जाऊं द्या हो चटपटे ! बरं, काय सांगत होतां तुम्ही मघाशीं ?

**चटपटे** : तुमच्या आजच्या आनंदांत भर घालणारीच वार्ता सांगणार होतों. प...ण....

**माधव०** : मग त्यांत अडखळतां कां ?

**चटपटे** : जरा लाज वाटते !

**माधव०** : काय लाज वाटते ?

**भोला०** : अहो, तुम्ही एवढे भानगड गल्लींतले, जगाच्या भानगडी सोड-वणारे—म्हणजे जगाला अधिक भानगडींत घालणारे—तुम्ही वकील आणि तुम्हांला लाज ? खरं म्हटलं तर वकिलाला लाज असतां कामा नये ! त्यांत तुम्ही भानगड गल्लींतले नामांकित वकील—म्हणजे निर्लज्जच !

**चटपटे** : मास्तर, पुटपुटूं नका, गप्प बसायला काय घ्याल ?

**भोला०** : कांहीं नाहीं !—कफल्लक तूं, तुझ्यापासून मी घेणार काय म्हणा !

**माधव०** : चटपटे, चटकन् काय तें बोला. मला मग सभेला जायचं आहे !

**चटपटे** : बरं तर ! लज्जा टाकून मी असं म्हणतों—

**भोला०** : म्हणजे निर्लज्ज बनून !

**माधव०** : बोला, चटपट बोला.

**भोला०** : आणि लटपट उडवा !

**चटपटे** : रावबहादुर, लौकरच तुम्हांला एक नवी पदवी देण्याचा माझा विचार ठरला आहे.

**माधव०** : वा:, अगदीं साहेबाचाच आव आणतां कीं ! तुम्ही काय पदवी देणार मला ? तुम्ही म्हणजे कांहीं साहेब नाहीं !

**भोला०** : हा साहेब नसला तरी त्याच्यापुढं घोळूं शकतो—शेंपूट !

**चटपटे** : मास्तर, पुटपुटूं नका बुवा असे ! रावबहादुर, माझा असा पक्का निर्धार झाला आहे कीं, तुम्हांला आणखी एक पदवी मिळवून द्यावी !

**माधव०** : ती कोणती ? म्हणजे तुम्ही मला काय करणार ?

**चटपटे** : मामा !

**माधव०** : काय, तुम्ही मला मामा करणार ?

**भोला०** : म्हणजे मामा बनवणार !

**माधव०** : तें कसं काय ?

**चटपटे** : तुमचा जामात होऊन ! मला तुमचा जामात केलंत कीं, तुम्ही मामा झालांतच !

**भोला०** : अगदीं खरं !

**माधव०** : अस्सं होय ? ठीक आहे. चांगला तरुण वकील जामात होण्यासाठीं घरीं चालून आला—मास्तर, ही आनंदाची वार्ता आधीं तिला कळवा पाहूं !

**भोला०** : होय, कळवतों आणि सुलभला हें पात्र काय योग्यतेचें आहे तेंहि सांगतों—( जातो. )

**माधव०** : पण हें पहा चटपटे ! मी आहें सुधारक. या बाबतींत प्रत्यक्ष मुलीची संमति मला घ्यावीच लागेल. सुलभच्या परीक्षेला तुम्ही उतरलांत—

**मथु०** : ( प्रवेशून ) काय बरं ?

**माधव० :** अग, मघाशीं सुलभ थट्टेनं म्हणाली ना ? तसंच झालं आहे ! आपले हे भावि जामात—म्हणजे आमचे जांवई होऊं इच्छिणारे हे चटपटे वकील—स्वतःच सुलभला मागणी घालायला आले आहेत—ध्यानींमनीं नसतां हे आभाळांतूनच उतरले आहेत, म्हणेनास ? माझ्या सुधारकी विचारांना जुळणारी अशीच यांची ही स्वतंत्र वृत्ति आहे. मला पसंत आहे ही वृत्ति ! जा, सुलभलाच चहा घेऊन पाठव इकडे ! म्हणजे भावि पतिपत्नींचं समोरासमोर बोलणंचालणंहि होईल ! ( मथुअक्का जाते. ) चटपटे, सुलभ आली कीं, समक्षच काय तें बोला. मी वाढत्या वैभवाचा सुधारक आहें. मला लग्नाची ही साहेबी रीत पूर्ण मान्य आहे. तुम्ही तिच्याशीं बोला—तीहि तुमच्याशीं बोलेल. अगदीं चुणचुणीत मुलगी आहे ती ! अगदीं स्पष्ट बोला. मघांच्यासारखे लाजूं मात्र नका हं ! एकुलती एक मुलगी, लग्न झालं कीं सुटलों साऱ्या चिंतेंतून ! लाजूं नका, तुम्ही एका गाजलेल्या सुधारकाचे, साहेबी रीतभात पसंत असलेल्या रावसाहेबाचे—नव्हे रावबहादुराचे—जामात होऊं पहात आहांत ! पसंतीनापसंती संपली कीं, ताबडतोब रजिस्टरला बोलावून नोंदणी पद्धतीनें—अगदीं साहेबी पद्धतीनें—लग्न उरकून घेऊं. ( मथुअक्का सुलभला घेऊन येते. सुलभ चहापात्रें मांडते.)

**मथु० :** लग्न उरकण्याची भाषा इतक्यांत कशाला ? लग्न नोंदायचं कीं आपल्या पूर्वापार पद्धतीप्रमाणं गाजतवाजत थाटायचं तें पुढें ठरवितां येणार नाहीं का ?

**माधव० :** अगदींच जुनीपुराणी आहेस तूं ! साहेबी थाटाचं मर्म तुला मूढेला काय कळणार ? चल, मला माझा नवा पोषाख काढून दे. मला सभेला जायचं आहे. ( जातात. ) ( सुलभ चहा तयार करते. मास्तर बाजूला उभे रहातात. थोड्या वेळानें अक्का येतात. )

**सुलभा :** ( चटपटे चहा न घेतां आपल्याच तोंडाकडे टक लावून बसला आहे असें पाहून ) अहो पाहुणे, चहा घ्या; माझ्या तोंडाकडे काय पहात राहिलांत ?

**भोला० :** तुझ्या मुखाच्या स्वच्छ आरशांत तो आपलं काळं तोंड पहातो आहे !

**चटपटे :** अं ! ( भानावर येऊन ) काय म्हणालांत ?

**सुलभा :** हा चहा तुमच्यापुढं तोंड वासून बसला आहे त्याला आधीं तोंड लावा !

**चटपटे :** तुम्हीहि घ्या कीं थोडा—

**सुलभा :** क्षमा करा. मी अवेळीं चहा घेत नाहीं.

**मथु० :** ( येऊन बसत ) खरंच चटपटे, माझी बाळी मोठी गुणाची आहे. ती चहा, खाणेंपिणें, अभ्यास, सर्व कांहीं वेळच्या वेळीं करते.

**चटपटे :** पण मामी...

**मथु० :** माझं नांव मामी नाहीं, अक्का आहे.

**चटपटे :** पण माझी मनीषा अशी आहे कीं, तुम्ही लौकरच माझ्या मामी व्हावं !

**भोला० :** पण हें पहा चटपटे, आधीं तुम्ही रावबहादुरांना मामा बनवा आणि मग यांना मामी म्हणा ! बाकी, तुम्ही लोकांना मामा बनविण्याच्या बनवाबनवींत आहांतच तरबेज !

**मथु० :** आलं माझ्या ध्यानांत. आज तुम्ही नुसते पाहुणे आहांत. जें काय पुढं व्हायचं तें सुलभच्या संमतीवर अवलंबून आहे.

**सुलभा :** म्हणजे ग काय आई ?

**मथु० :** म्हणजे असं कीं, हे चटपटे वकील तुला लग्नाची मागणी घालायला आले आहेत.

[ राग–भीमपलास–ताल–त्रिताल ]

**बघ बाळे येति पति दारीं । योग गमे**
**नवलाचा । सुखकारी ॥ ध्रु० ॥**
**शिकतां बनती धीट नरनारी ।**
**निवडति तीं अपुला सहकारी ॥**
**आली ही रीत नवीन सारी ।**
**देई तीस मान संसारीं ॥ १ ॥**

**सुलभा** : अस्सं का ? बरं तर ! ( चटपट्याजवळ खुर्ची ओढून घेऊन बसते. ) बोला, काय आहे तुमची मागणी ?

**चट०** : मागणी कांहीं फारशी मोठी नाहीं. तुम्ही माझ्याशीं लग्न करून मला पवित्र करावं.

**सुलभा** : काय, मी तुम्हांला पवित्र करणार ?

**भोला०** : होय बाळ,—आमच्या जुन्या जमान्यांत मुलीला, पदरीं पडली नि पवित्र झाली, असें म्हणत असत. पण आतां काळ पालटला आहे. हे तुझ्या पायावर लोटांगण घेत आले आहेत ! त्यांना पाय लाव आणि पवित्र कर.

**चट०** : ( स्वगत ) काय म्हातारा वर्मी घाव घालतो आहे पण !

**सुलभा** : म्हणजे हे अपवित्र का आहेत ?

**चट०** : त्यांना काय विचारतां ? मला विचारा. खरं म्हटलं तर...

**भोला०** : खरं तेंच बोला. खोटं बोलायला हें कांहीं कोर्ट नाहीं ! बाकी तुमची खोड जाणार कशी म्हणा ! तशांत भानगड गल्लींतले भानगडी वकील तुम्ही !

**चट०** : कां हो, तुम्ही कां उगाच पुटपुटतां ? आम्हांला बोलूं द्या कीं ! तुमची भानगड...

**भोला०** : भानगड तुमची ! माझी नाहीं.

**चट०** : बरं माझी ! आतां तरी पुटपुटणं सोडाल का ?

**मधु०** : जाऊं द्या हो पाहुणे ! मास्तरांना अशीच पुटपुटण्याची संवय आहे.

**चट०** : अस्सं ! बरं मग सुलभा...सुलभा...

**सुलभा** : कां अडखळलांत ? म्हणा कीं मला सुलभाताई !

**चट०** : ताई कसं म्हणूं ? मी तुम्हांला लग्नाची मागणी घालीत आहें.

**सुलभा** : पण मी कुठं संमति दिली आहे ? मी आहें सुधारक बापाची शिकलेली मुलगी. लग्नाची गोष्ट सर्वस्वीं माझ्या संमतीवर अवलंबून आहे.

**चट०** : मग द्या संमति—

**सुलभा** : हें पहा, तुम्ही लग्न करणार म्हणजे जन्माची जोडीदारीण पहाणार, होय ना ? मग तिचे गुण—अवगुण नकोत का पारखायला ?

**भोला०** : हा काय गुणांची पारख करणार ? हा रत्नपारखी थोडाच आहे ? हा आहे गाजरपारखी !

**चट०**: हें पहा, तुमचं रूप पाहिलं आणि लगेच परीक्षा केली ! तुमचं रूप सुंदर आहे तेव्हां तुम्ही गुणवती असलांच पाहिजे.

**मथु०** : म्हणजे अंगांतले गूण बाहेरच्या रूपावर का अवलंबून असतात ?

**चट०** : हो तर ! सुंदर रूप म्हणजेच सद्गुणांची खाण !

**सुल०** : छान कोष्टक सांगितलंत ! तुमचं रूप कांहीं तितकंसं चांगलं नाहीं, तेव्हां तुम्ही दुर्गुणी असालच !

**चट०** : चुकतां तुम्ही सुलभा......

**भोला०** : म्हणा ताई !

**चट०** : पुरुषांचं रूप पहायचं नसतं. रूप पहायचं असतं स्त्रियांचं ! पुरुष म्हणजे ओबडधोबडच असावयाचा !

**सुल०** : मग पुरुषाची परीक्षा कशी करावयाची असते ?

**भोला०** : त्याच्या अंगांतील पराक्रमावरून ! सांगा, चटपटे, तुमचा पराक्रम काय तो वर्णन करा. पण तसं कशाला ? मीच तें सांगतों. बाळ, हे आहेत भानगड गल्लींतले चटपटे वकील ! यांची वकिली जगांतल्या भानगडींवर चालते. हे खऱ्याचं खोटं आणि खोट्याचं खरं करण्यांत निष्णात आहेत. समजा, उद्यां जर जगानं भानगडी करायचं सोडलं तर यांना परवां आपल्या नांवाच्या पाटीचा लिलांव पुकारावा लागेल.

**चट०** : अगदीं खरं बोललांत मास्तर ! उगाच कशाला सांगायला लाजूं ?

**भोला०** : नकाच लाजूं. अगदीं निर्लज्जपणं काय तें सांगा.

**चट०** : आम्हां वकिलांचं भाण्डवल म्हणजेच मुळीं जगांतल्या भानगडी ! भानगडींशिवाय जग नाहीं...

**भोला०** : आणि वकिलाशिवाय भानगडी नाहींत !

**चट०** : ( स्वगत ) छेः, हा म्हातारा कांहीं नीट बोलूं देणार नाहीं. हिला केव्हांतरी एकटीलाच गांठलं पाहिजे.

**माधव० :** ( प्रवेशून ) कसं काय भोलाराम मास्तर ? केली का वधूवरांनीं एकमेकांची परीक्षा ?

**भोला० :** परीक्षा चालू आहे. अजून कांहीं ती संपली नाहीं. मी विचारूं का पाहुण्यांना दोनचार प्रश्न ? लौकर निकाल लावतों हवा तर ! (पुटपुटत) म्हणजे अगदीं निकालच लावतों.

**चट० :** हें पहा मास्तर, मला कांहीं तुमच्याशीं लग्न करायचं नाहीं. तुम्ही गप्प बसा. जी काय परीक्षा घ्यायची असेल ती वधूलाच घेऊं द्या.

**सुल० :** बरं तर–सांगा आतां. मला मागणी घालण्याचं जें हें धैर्य तुम्हांला झालं तें कशामुळं ?

**चट० :** अगदीं जुन्या रीतिरिवाजाप्रमाणं सांगायचं झालं तरी, तुमचा–माझा धर्म एक, तुमची—माझी जात एक !

**सुल० :** म्हणजे तुम्ही धर्म मानतां ?

**चट० :** मी नाहीं मानीत धर्मबिर्म ! पण तुम्ही मानीतच असाल तर तोहि माझ्याजवळ आहे. स्पष्ट बोलायचं तर मी धर्म ही एक भानगड आहे असं समजतों.

**भोला० :** योग्य तेंच समजतां तुम्ही ! तुमच्यासारखे अधर्मी लोक जेव्हां भानगडी करतात तेव्हां धर्माचेच पाय धरतात ! हल्लीं पुष्कळशा भानगडी पुरोगाम्यांना आमच्या धर्मानंच भानगडींतून मुक्त केलं आहे !

**सुल० :** बरं, तुमची माझी जात एक आहे असं म्हणालांत तें कसं काय ?

**भोला० :** अगदीं सोपं आहे या प्रश्नाचं उत्तर ! सुलभेची स्त्रीजात आणि यांचीहि तीच !

**चट० :** म्हणजे मास्तर ? माझी स्त्रीजात आहे कीं काय ?

**भोला० :** तसंच म्हणा ना ! ज्या पुरुषाच्या अंगांत पराक्रम नाहीं त्याची गणना स्त्रियांतच केली पाहिजे.

**चट० :** छे:–छे:–छे:–छे: ! भण्डावून सोडलं या म्हाताऱ्यानं ! (घड्याळ पाहून) खरंच रावबहादुर, तुमच्या सभेची वेळ झाली. चला–येईन पुन्हा केव्हां तरी !

**माधव०** : हो खरंच कीं ! चला तर. ( पत्नीस ) अग, तुलाहि आलं पाहिजे आज माझ्याबरोबर ! सभेच्या चालकांनीं तुला अगदीं आग्रहानं बोलावलं आहे. शिवाय, पत्नीसह सभेला जाणं हा साहेबी शिरस्ता आहे ! तुम्हीहि चला मास्तर.

**भोला०** : कशाला ?

**माधव०** : माझ्या भाषणाचा वृत्तान्त वृत्तपत्रांतून द्यायला !

**भोला०** : मला काय समजतं त्यांत ?

**माधव०** : तुम्हांला नको कांहीं समजायला ! तुम्ही संपादकांना जाऊन माझा नुसता निरोप सांगा. संपादक समजदार असतात ! पांच रुपड्यांच्या देणगीच्या आशेनं पांच स्तंभी वृत्तान्त छापतील ! शिवाय, आजच्या आनंदाप्रीत्यर्थ मला पांचपन्नास रुपयांच्या भक्कम देणग्यांची खैरात करायचीच आहे ! चला–सुलभ, तूंहि चल—

**सुलभा** : नको बाबासाहेब, माझी परीक्षा जवळ आली आहे. मी बसत्यें घरांतच अभ्यास करीत.

**माधव०** : बरं तर, तसं कर. चला बाईसाहेब, पुढं व्हा. सुधारकी सभेंत स्त्रियांचा मान पुढं असतो.

**भोला०** : आणि घरांत मागं पडतो. ( माधवराव, मथुअक्का पुढें होतात. चटपटे मागें रेंगाळतो त्यास ) अहो पाहुणे, चला कीं ! आतां कां घोंटाळतां ! ( जाऊं लागतो. )

**चटपटे** : हा आलोंच ! ( सुलभेस ) बरं, नमस्कार. भेटूं पुन्हा लौकरच.

**सुलभा** : नमस्कार. ( चटपटे व मास्तर गेल्यावर ) काय लोंचट आहे पुरुषांची जात तरी ! एखादी तरुण नि सुंदर मुलगी दिसली कीं, लागले मेले लाळ घोंटायला !

[ राग–मिश्रमांड–ताल–धुमाळी ]

**नवला जात ही नराची । कामुक लंपट**
**लाज न लव कांहीं मनाला ॥ ध्रु० ॥**
**वाटे विधि गेला विसरुनिया ।**
**मन सुधें शुभ द्यावया ।**
**नर वानर केला ॥ १ ॥**

[ सुलभा आंत जाते. तिच्या गुणगुणण्याचा आवाज ऐकूं येत असतो. इतक्यांत दोन गुण्ड एका मूर्च्छित तरुणाला–सुहासला–घेऊन येतात व बंगल्याच्या दारांत ठेवतात. सुहास हळुहळु शुद्धीवर येत आहे असें पाहून पळ काढतात. सुहास कण्हूं लागतो व आपण कोठें येऊन पडलों आहोंत तें पाहूं लागतो. तो एका खुर्चीला धरून उठूं लागतो तों ती कोलमंडते. तो आवाज ऐकून भैरू येतो. ]

**भैरू :** कोण वो तुमी आन् असे इथं धडपडतसा कां ? ( सुहासची दीन स्थिति पाहून ) अव सुलभाताई, या हकडे बिगीबिगी ! ह्यो कुनी पाव्हना हथं येऊन पडला हाय. या बिगीबिगी ! ( त्याला धरून नीट कोचावर बसवतो. )

**सुलभा :** ( घाईनें येऊन ) कोण आलं आहे रे भैरू ?

**भैरू :** ह्ये पगा पाव्हने आले हायत ! कुनी तरी यांना मारलेलं दिसतंया.

**सुलभा :** ( सुहासजवळ येऊन ) काय झालं तुम्हांला ?

**सुहास :** मला बराच मुका मार लागला आहे. पण घाबरण्याचं कारण नाहीं. मी मूर्च्छित पडलों तेव्हां कुणीतरी मला इथं आणून टाकलेलं दिसतं. आतां मी शुद्धीवर आलों आहें. मला थोडं पाणी देतां का ?

**सुलभा :** अशा स्थितींत तुम्ही पाणी पिऊं नका. थोडी गरम कॉफी घ्या म्हणजे बरं वाटेल. ( भैरूस ) भैरू, आंतल्या कपाटांतले पैसे घे आणि समोरच्या विश्रांतिगृहांतून चांगली दुधाची कॉफी आण. पण लौकर ये हं. ( भैरू जातो. )

**सुहास :** मी तुमचा फार आभारी आहें. मी इथं कसा आलों याचं तुम्हांला आश्चर्य वाटत असेल पण त्याचं खुद्द माझं मलाच अधिक आश्चर्य वाटतं आहे. मी कोण, इथं कसा आलों, मला कां मार बसला, तो कुणी दिला, या सर्व गोष्टी ऐकण्याची तुम्हांला उत्कण्ठा लागली असेल पण...( इतक्यांत त्याच्या पाठींत थोडी कळ येते म्हणून तो ओय् ओय् करतो. )

**सुलभा :** हें पहा, तें सर्व तुम्हांला अधिक बरं वाटल्यावर मग सांगा. तुम्ही सज्जन दिसतां. मला तुमच्याविषयीं काडीइतकीहि शंका वाटत नाहीं. तुम्ही आंतल्या बाजूला चला आणि कॉटवर पडून रहा. मी तुमच्या पाठीला उपचार करतें. ऊं हूं ! कांहीं शंका मनांत आणूं नका आणि आतां फार बोलूंहि नका. चला आंत. ( त्याचा हात धरून त्यास उठवते. )

**सुहास :** तुमचे उपकार....

**सुलभा :** यांत उपकार कसले ? तुमच्या अशा दीन अवस्थेंत तुमची शुश्रूषा करणं हें माझं कर्तव्यच होय. चला आंत.

**सुहास :** पण मी कोण...

**सुलभा :** तुम्ही कुणीहि असा. या वेळीं तुम्ही आमचे पाहुणे आहांत. आतां अधिक बोलूं नका. चला आंत.

**सुहास :** बरं तर, तुमची कृपा. ( तिच्या खांद्यावर हात टेंकून आंत जातो. ती आंत गेल्यावर चटपटे येतो व इकडे तिकडे हिंडून कोंचावर लवंडतो आणि मेजावरील वर्तमानपत्र वाचूं लागतो. इतक्यांत त्याला आंत कोणी तरी बोलत असल्याचा भास होतो. )

**चटपटे :** आंत कोण बोलतं आहे ? सुलभा तर इथं एकटीच अभ्यासाला म्हणून राहिली मग ती कुणाशीं बोलत आहे ? ( ऐकून ) खात्रीनं ती कुणाशीं तरी बोलत आहे आणि तिच्याशीं बोलणारा कुणीतरी पुरुष असला पाहिजे असं वाटतं. हो, खात्रीनं! हा पुरुषाचाच आवाज ! हा कोण पुरुष सुलभच्या खोलींत? कांहीं भानगड तर नसेल ? माझ्या वकिली नाकाला इथं भानगडीचाच वास येतो. पहावंच डोकावून आंत काय चाललं आहे तें ! ( तो आंत चोरून पहात रहातो. भैरू कॉफी घेऊन येतो व चटपट्याचा चोरटा उद्योग पहातो. )

**भैरू :** ( चटपट्याच्या कोटाला धरून मागें खेंचीत ) च्वारा, काय रे आंत डोकावून पगतुयास ? चल, हो तकडे ! च्वार ल्येकाचा ! ( त्याला हिसडा देतो. )

**चटपटे** : काय रे गधड्या, मला हिसडा देतोस? मी कोण? मी कोण?
**भैरू** : तुमी कोन? च्वार! च्वारासारखं हथं चोरून पगत व्हतां! च्वार त्यो च्वार आन्...
**चटपटे** : हां, जास्त फाजीलपणानं बोलूं नकोस. जा, ताईसाहेबांना सांग, चटपटे वकील तुमच्या भेटीला आले आहेत म्हणून!
**भैरू** : स्वांगतों, समदं स्वांगतों. वांयूच थांबा. येवडी कापी घेऊन येतो पाव्हन्यास्नी! वांयूच थांबा—( आंत जातो. )
**चटपटे** : हा खराच कुणी पाहुणा दिसतो! पण हा कोण पाहुणा इतक्यांत इथं येऊन कोंसळला? मघाशीं तर इथं कुणीच पाहुणा दिसत नव्हता. ही कांहीं तरी भानगड असली पाहिजे खास. ( भैरू घाईघाईनें येतो त्यास ) कायरे, सांगितलास का माझा निरोप?
**भैरू** : वांयूच थांबा म्हंगतो ना? बसा तथं मुकाट! ( आंत जातो. )
**चटपटे** : ही काय गडबड आहे बरं? फार मोठी भानगड दिसते. ( पुढें होऊन ) पाहूंच का? ( मागें येऊन ) पण नको. ( भैरू गरम पाण्याची पिशवी घेऊन येतो. ) भैरू, काय रे हें?
**भैरू** : कां डोळे नायत का तुमास्नी? ह्ये पगा गरम पानी!
**चटपटे** : कशाला रे तें? कोण आहे रे तो पाहुणा?
**भैरू** : समदं स्वांगतों. वांयूच थांबा कीं! बसा तथं मुकाट! ( त्याला ढकलून जातो. )
**चटपटे** : काय करावं? कांहीं लक्षांत येत नाहीं. तो पाहुणा, ती सुलभा, ती आंतली खोली, तिच्यांतील ही कुजबूज, ती चहाकॉफी, तें गरम पाणी, त्या गड्याची ही धांदल, अगदीं अगदीं डोकं फिरून जायची वेळ आली! पाहूंच कां आंत पुन्हा चोरून? पण नको, तो भैरू येऊन मानगुटी पकडायचा! अरे, पण हा आलाच कीं! ( घाईघाईनें पण चोरपावलांनीं परत कोंचाकडे येऊं लागतो तों भैरू येतो आणि पहातो. )
**भैरू** : का वो राव, तुम्हास्नी मघां सांगितलं ना तथं मुकाट क्वाचावर बसा! पुन् तुम्ही नाय ऐकत! समजा, अगदीं या भितीजवळ जाऊन ऐकलांत तरी

काय तुम्हास्नी आमंदीचं बोलनं ऐकाया यनार? खूप लांब कान तुमास्नी असते तरी त्यें साधलं नस्तं पगा. बसा मुकाट. तायसाव अत्तां येत्याल.

**चटपटे** : ( विचार करून आणि खिशांतील रुपया काढून ) हें पहा भैरोबा, तूं इमानी नोकर आहेस. माझी खात्री झाली तशी, ही तुझी धांदल पाहून!

**भैरू** : अन् माजीबी खातरी जालीया.

**चटपटे** : कसलीरे? हें पाहिलंस का? ( रुपया दाखवतो. )

**भैरू** : माजी धांदल पगून जशी तुमच्या मनाची खातरी झाली कीं मी इमानी हाय, तशी तुमच्या जिवाची धांदल पगून माजी खातरी जाली की तुम्ही बेमान आहांत!

**चटपटे** : पण हें पाहून? ( रुपया देऊं लागतो. )

**भैरू** : आन् ये पगून निश्चो जालाया कीं तुमी डांबीस हायत!

**चटपटे** : काय म्हणतोस? पुन्हा म्हण पाहूं!

**भैरू** : पुना बी त्येच म्हंगेन आन् दोन हाणूनश्यान् म्हंगेन!

**चटपटे** : म्हण–म्हण पाहूं पुन्हां!

**भैरू** : आदी चारचौघ जमूद्यात! त्येसिवाय नाय् तुमची पुरी शोबा व्हायची! चारचौघांना फुकाटची गंमत पाह्यला मिळल!

**चटपटे** : अरे गाढवा...

**भैरू** : लांब कान तुमच आन् मलाच उलट गाडव म्हंगतां–खासा न्याव!

**चटपटे** : तोंड आटप, नाहीं तर फोडून टाकीन तें!

**भैरू** : माजं त्वांड फोडणार तुमी? व्हय! अर, नुसती भेंडीची भाजी खाऊन नाय् दिस काढीत मी...( त्याला धरून ओढीत ) या असं म्होरं! होऊं द्यात दोन हात!

**चटपटे** : अरे, अरे, अरे! फाजील...गाढव....( ओरडतो. )

**सुलभा** : ( गडबड ऐकून येते ) कोण फाजील? कोण गाढव?

**भैरू** : ( त्याला सोडून देतो. तो मागें कोंचावर आपटतो. ) ह्यो फाजील, ह्यो गाडव, ह्यो ह्यो डां....

**चट०** : पुरें बोल, पुरें बोल, ऐकूंद्या तुझ्या ताईसाहेबांना!

**भैरू :** पुरतं बोलतों, अधूरं नाय सोडीत! ताईसाब, ह्यो कुनी डांबीस मानूस दिसतुया—

**सुलभा :** अरे कुणाला काय बोलतोस याची कांहीं शुद्ध आहे का तुला? अरे, हे बाबासाहेबांचे मित्र चटपटे वकील! त्यांना असे अपशब्द बोलूं नयेत!

**भैरू :** तायसाब, क्षेमा करा. सपस्ट सांगतुया, ह्यो वकील अगदीं न्यारा दिसतुया. बाबासायबांकड दुसर बी वकील येत्यात पुन् ते किती संभावित! नायतर ह्यो! तुमी आमंदी काय करत व्हता ते हा च्वारून पगत व्हता आन् कान लांब करूनश्यान् तुमी काय बोलतां ते ऐकत बी व्हता! ह्येला नीट म्हंगालो, बाबा, मुकाट हतं बैस काचावर अत्तां येत्याल तायसाब, पुन् याची ख्वाड काय जायना—आन् तायसाब, खंडूबाची शपात घेऊन सांगतुया ह्यो मस्नी एक रुपया लांच देत व्हता, तुमी कुनाशीं काय बोलत व्हता ते सांगायासाठीं! ह्याचा मस्नी असा राग आला, असा राग आला, खर सांगतुया, तुमी जर इकत्यांत आला नसता, तर मी याचं डोकसंच फोडलं असतं! माजं डोकसं अगदीं फिरून गेलं व्हतं पगा! (चटपट्यास) अर, तू काय मानूस हायेस की मुंगस?

**सुलभा :** जा तूं आंत. आलं माझ्या ध्यानांत सगळं. मी सांगतें त्यांना काय तें. तूं जा आणि हें बघ, त्या पाहुण्यांना कांहीं लागलं तर आणून दे. पैसे आहेतच कपाटांत. आणि हें बघ, त्या पाहुण्यांची चांगली सेवाचाकरी कर. आतां त्यांना पुष्कळच बरं वाटतं आहे. (भैरू चटपट्याकडे रागानें डोळे वटारीत आंत जातो.) पाहिलंत का? तुमच्या असल्या गैरवागणुकीनं इतर चांगल्या वकिलांच्या नांवाला काळिमा लागतो. एकलंत ना तो काय म्हणाला तें?

**चटपटे :** (चिडलेल्या आवाजानें) तो तुम्हांला काय म्हणाला तेंहि ऐकलं आणि तुम्ही त्याला काय सांगितलंत तेंहि ऐकलं. आतां माझी पुरी खात्री झाली आहे कीं, तुम्ही बाबासाहेबांच्या गैरहजेरीचा गैरफायदा घेऊन आंत कांहींतरी भयंकर भानगड करीत होतां! तो पाहुणा कोण? बाबासाहेब

बाहेर गेले आहेत, घरांत तुमच्याशिवाय दुसरं कोणी जाणतं माणूस नाहीं असं पाहून तो इथं कां आला, कसा आला, तुमच्या खोलींत....

**सुलभा :** चटपटे, फार वहावलांत तुम्ही ! तोंड आंवरा. मीच तुम्हांला खडसून विचारत्यें, तुम्ही मला कोण हे प्रश्न विचारणार ? अं ? कोण तुम्ही ?

**चटपटे :** मी कोण ? मी रावबहादुर माधवराव संतोषे–तुमचे वडील–यांचा लौकरच होणारा जांवई, अर्थात् तुमचा....

**सुलभा :** तें पहातां येईल पुढं ! आधीं तुम्ही इथून बऱ्या बोलानं चालते व्हा...करा आपलं तोंड काळं...

**चटपटे :** तुम्हांला माझें तोंड इतक्यांत काळं दिसूं लागलं ना ? बरोबरच आहे, गोरं तोंड दिसलं असेल...

**सुलभा :** नाहींच तुम्ही ऐकायचे तसे ! मघाशीं बाकी राहिलेली शोभा तुम्हांला पुरती करून घ्यायची असेल ! भैरू, अरे भैरू—

**चटपटे :** कशाला बोलावण्याची तसदी घेतां ? मी जातों. रावबहादुर सभा आटोपून परत यायला निघालेच असतील, त्यांना तडक इकडेच घेऊन येतों. ते येईपर्यंत त्या पाहुण्याला मात्र इथून जाऊं देऊं नका. ( पाय आपटीत जातो. भैरू चिमटा घेऊन येतो. )

**भैरू :** कुट हाय् त्यो ? अं ? कुट हाय् ?

**सुलभा :** अरे कोण ? पहातोस काय असा ? आणि हें काय आणलंस ? चिमटा ? ( हंसते. )

**भैरू :** व्हय् चिमटा आनलाया त्या विचवाला धराया. आमी इचू असेच धरतों. चिमट्यांत त्येंची नांगी धरली कीं, पडला इचू निपचित ! काय, ग्येला त्यो ?

**सुलभा :** गेला तो, तुला हांक मारतांच त्यानं पोबारा केला ! ( हंसते. ) खरं आहे तुकोबारायाचं म्हणणं. अशांना शब्दांचा मार पुरा पडत नाहीं. तुका म्हणे ऐशा नरा !...( खूप हंसते. ) बरं, जा तूं. पाहुण्यांची प्रकृति आतां कशी आहे ?

**सुहास :** ( बाहेर येऊन ) आतां माझी प्रकृति ठीक आहे. ( भैरू जातो. ) तसं म्हटलं तर मला काय झालं होतं असं मोठं ? मुका मार बसल्यामुळें मी बेशुद्ध झालों होतों इतकंच. मघाशींच शुद्धीवर आलों. पाठींत थोडी कळ येत होती ती तुम्ही गरम पाण्यानं पाठ शेकलीत तेव्हांच कमी झाली आणि भैरूनं पाठ रगडतांच, कुठच्या कुठं ती पळूनहि गेली. आतां मी पूर्ववत् बरा झालों आहें. पुष्कळ वेळ झाला मला इथं येऊन ! मी जातों आतां.

**सुलभा :** आणखी आराम घ्या. आतां इतक्यांत आईबाबा येतील. त्यांना तुमची हकीकत सांगा म्हणजे त्यांनाहि तुमच्याविषयीं आदर वाटेल. आणखी हें पहा, तुम्ही थोडं फराळाचं घेतल्याशिवाय इथून जाऊं नका. कांहीं झालं तरी तुम्ही आतां आमचे सन्मान्य पाहुणे झालां आहांत. त्या बदमाषांना तुम्हांला इथं आणून टाकण्याची बुद्धि परमेश्वरानंच दिली असली पाहिजे.

**सुहास :** साऱ्या गोष्टी योगायोगानंच घडून आलेल्या आहेत. पण जी गोष्ट पुरी निकालांत काढल्याशिवाय मी इथं आलों, तिचं पुढें काय झालं तें मला जाऊन पाहिलंच पाहिजे. भेटेन पुन्हा केव्हां तरी ! आतां मी जातों. पण जाण्यापूर्वी पुन्हा एकदां मनःपूर्वक आभार मानल्याशिवाय माझ्यानं जाववत नाहीं. बोला, मी तुमचे उपकार कसे फेडूं ?

[ राग–जिल्हा, ताल–झपताल ]

**हा उपकार तव फार । साहूं मी**
**कैसा साचार ॥ ध्रु० ॥**
**केली जी सेवा । सुखविलें मजला**
**साचार । नाहीं तुला तिजला ॥ १ ॥**

**सुलभा :** हें पहा, आभार मानायचेच असले तर ज्या परमेश्वरानं तुमच्या माझ्या भेटीचा असा चमत्कारिक नि अकल्पित योग घडवून आणला त्याचे आभार माना. आमचे भोलाराम मास्तर नेहमीं सांगत असतात कीं, सारे योगायोग परमेश्वरच घडवून आणीत असतो म्हणून. तेंच मी आज प्रत्यक्ष खरं झालेलं पहात आहें.

**सुहास :** ( तिच्या मनगटावरील घड्याळ पहात ) मी जातों आतां. किती वेळ झाला पाहिलात का ? ( तिचा हात धरून तिला वेळ दाखवितो. तोंच चटपटे बाबासाहेबांना आणि मथुअक्कांना घेऊन येतो. भोलारामहि येतात. )

**चटपटे :** रावबहादुर, नीट डोळे फाडून पहा, तुमची मैना तुमच्या गैरहजेरींत एका पोपटाला गांठून काय रंगढंग करते आहे ती ! ( सुहासला ) अहो पोपटराव, नका सुलभेचा हात सोडूं इतक्यांत ! तिच्या आईबापांना नीट डोळे भरून तुमचे चाळे पाहूं द्यात !

**सुल० :** ( सुहासचा हात सोडून नि मागें वळून ) कसले चाळे ? काय म्हणतां तुम्ही ?

**चटपटे :** मी कांहीं म्हणत नाहीं ! माझ्यापुरतं विचाराल तर मला इथं कांहीं तरी भयंकर भानगड दिसते आहे !

**माधव० :** ( संतापानें ) कारटे, काय आहे ही सारी भानगड ?

**मथु० :** ( सुलभेच्या जवळ जाऊन ) काय ग, काय आहे हें सारं ? कोण हे ? कां आले इथं ? चटपट्यांनीं आम्हांला जें जें सांगितलं तें खरं का ? सांग तरी !

**चटपटे :** काय सांगणार ती बिचारी ? बोलूनचालून सारी भानगड !

**भाला० :** गप्प बसा तुम्ही भानगडगल्लींतले भंगडराव !

**चटपटे :** काय, मी भंगडराव ? भले मास्तर ! आहांत खरे बिनडोक्याचे पंतोजी ! भानगड करतात हे आणि ठरवतां भंगडराव मला ! आतां रावबहादुरच काय तो निर्णय देतील भांग झोंकली आहे ती तुम्ही कीं मी तें !

**माधव० :** मास्तर, या वेळीं तुम्ही मध्यें बोलूं नका. माझा संताप अनावर होत आहे. कारटे—

**मथु० :** असं उगाच संतापायला काय झालं ? सुलभा काय म्हणते तें नीट शांतपणें आधीं ऐकायला नको का ? का उगाच आपलं साप समजून दोरीलाच धोपटणार ?

**सुलभा :** आई, तुझ्या पायांची शपथ घेऊन सांगतें, बाबांनीं संतापून जाण्यासारखं कांहीं एक इथं घडलेलं नाहीं. खरा साप हा चटपट्या आहे. यानंच बाबांच्या कानांत विष ओकलं !

**चटपटे :** खासा न्याय ! चोराला सोडून संन्याशाला सूळ ! जग उलटं चालतं हेंच खरं. मी साप, होय ना ? बरं आहे, मी दूर रहातों. ( दूर जाऊन उभा रहातो. ) रावबहादुर, तुम्हीच तुमची स्वतःची खात्री करून घ्या. या मास्तर तुम्ही इकडे—आपण आपापसांत पुटपुटत बसूं या. नाहीं तरी तुम्हांला पुटपुटायची खोड आहेच म्हणा !

**भोला० :** ( रागानें ) अरे हट् ! भंगड्या...

**सुहास :** ( पुढें होऊन ) हें पहा, या सर्व अनर्थाचं आणि गैरसमजाचं कारण मी आहें. मलाच काय तें सांगूं द्या. संताप आंवरा, संशयपिशाच्चाला दूर ठेवा आणि शांत चित्तानं ऐका.

**चटपटे :** अगदीं पूर्ण शांतपणानं बरं का रावबहादुर ?

**भोला० :** अरे हट् ! भंगड्या.......

**सुहास :** शेजारच्या पिंपळगांवांत मी समाजसेवा करीत असतों. रोजच्या-प्रमाणं मी गांवांत लोकांची विचारपूस करीत हिंडत असतांना गांवचे सर्वाधिकारी गुण्डोपन्त यांच्या घरांतून मला एका बाईचा आक्रोश ऐकूं आला. तो ऐकून मी घरांत शिरलों.

**चटपटे :** तुझ्या बापाचंच घर कीं नाही तें ? म्हणे खुशाल घुसलों दुसऱ्याच्या घरांत !

**भोला० :** अरे हट् ! भंगड्या...

**सुहास :** मी आंत गेलों तों गुण्डोपंत एका वेश्येच्या चिथावणीनं आपल्या पत्नीला मारहाण करीत असलेला मला दिसला. मी पुढें झालों आणि गुंडोपंताला चार दणके लगावून त्या माउलीला त्याच्या छळांतून सोडविलं. इतक्यांत त्याचे दोन गुंड माझ्यावर चालून आले. त्यांनीं मला कुबललं. मी मूर्च्छित पडलों. पुढं काय झालं तें अर्थातच मला कळलं नाहीं. मी जेव्हां शुद्धीवर आलों तेव्हां मला कळलं कीं, मी तुमच्या बंगल्यांत येऊन पडलों आहें.

**चटपटे :** अहो वीरशिरोमणी, भीमसेनाचे आधुनिक अवतार, छान कहाणीचं नाटक रचलंत ! नाटककार व्हा नाहीं तर गुण्डगिरीचं कथानक बनवून एखाद्या बोलपटाला...

**भोला०** : अरे हट्! भंगड्या...( त्याचें तोंड दाबतो. )

**सुहास** : पुढें तुमच्या मुलीनं माझी शुश्रूषा केली, भैरूनंहि फार श्रम घेतले, या दोन देवमाणसांचे उपकार मी जन्मात विसरणार नाहीं.

**माधव०** : म्हणजे, तूं सांगतोस ही हकीकत आम्ही सत्य मानावी असं तुझं म्हणणं ?

**मथु०** : काय झालं सत्य न मानायला? मला तर या हकीकतींत खोटेपणाचा संशय सुद्धां येत नाहीं. ( सुलभेस ) बाळ, एका समाजसेवकाची सेवा करून तूं आपलं कर्तव्यच केलंस. ( माधवरावांस ) ऐकलं का मी काय म्हणत्यें तें ?

**चटपटे** : आतां त्या चोराला डोक्यावर बसवून घ्या, हेंच कीं नाहीं ?

**भोला०** : अरे हट्! भंगड्या...

**माधव०** : मी अगदीं गोंधळून गेलों आहें. हा समाजकंटक आहे कीं समाजसेवक आहे ? हा साव आहे कीं चोर आहे ?

**चटपटे** : ( लगबगीनें पुढें होऊन ) हा चोर आहे चोर !

**भोला०** : अरे हट् ! भंगड्या....( त्याला दूर भिरकावतो. तों गुंडोपंत पोलिसांना घेऊन येतो. चटपटे गुण्डोपंताच्या अंगावर आपटतो. )

**गुंडो०** : ( चटपट्याला सांवरून ) कुठं आहे चोर ?

**चटपटे** : ( सुहासकडे बोट दाखवून ) हा पहा.

**गुंडो०** : खरंच कीं ! जमादारसाहेब, पहातां काय ? हाच तो चोर ! हाच गांवांत गुंडगिरी करीत असलेला सुहास ! पकडा याला आणि याची झडती घ्या !

**सुहास** : मला पकडून ठेवण्याचं कारण नाहीं. माझी खुशाल झडती घ्या. मी गुंड नाहीं, चोर नाहीं. या गांवगुण्डानंच माझ्यावर—आपलीं पातकं लपविण्यासाठीं—चोरीचा आळ आणला आहे. घ्या माझी झडती.

**चटपटे** : अगदीं कसून झाडेझडती घ्या आणि जेरबंद करून ठेवा. भलताच घट्टाकट्टा माजला आहे. हातावर तुरीसुद्धां द्यायचा !

**भोला०** : अरे हट्! भंगड्या...( शिपाई सुहासची झडती घेतात. त्याच्या खिशांत सोन्याच्या बांगड्या सांपडतात. )

**जमादार** : या बांगड्या कोणाच्या ? याच्या खिशांत सांपडल्या आहेत ! ( सर्व आश्चर्यचकित होतात. )

**गुंडो०** : या बांगड्या माझ्या !

**सुहास** : ( दगा आहे हें ओळखून, हंसत ) काय तुमच्या ? तुम्ही बांगड्या घालतां ? सारंच आश्चर्य ! कांहीं तरी दगा आहे खास !

**भोला०** : काय म्हणतां ? दगा ? ( कपाळावर हात मारतो. )

**चटपटे** : अरे हट्—मास्तरड्या ! सुहास, हे बांगड्या घालतात कीं नाहीं हें पुढें कळेलच ! पण या वेळीं तुझ्या हातांत मात्र लोखण्डी बेड्या पडणार आहेत ! जमादार, पहातां काय ? मुद्देमालासह चोर पकडला गेला आहे; ठोका याला बेड्या ! मी वकील चटपटे, मी कायदा जाणतों. गुंडोपंत, तुम्ही खटला भरा, मी ही भानगडीची केस, पाहिजे तर फुकट चालवतों. जमादार, पहातां काय ? ठोका बेड्या !

**जमा०** : तुम्ही गप्प बसा हो. तुम्ही वकील असाल पण आम्हांलाहि कायदा कळतो, बरं का ? सुहास कांहीं पळून जात नाहीं. आम्हांला आमचं कर्तव्य चांगलं कळतं. आमच्या कामांत विनाकारण ढवळाढवळ करूं नका. सुहास, तुम्हांला आम्ही गिरफदार केलं आहे. चला—

**सुहास** : थोडे थांबा, जमादारसाहेब ! माझ्या उपकारकर्त्यांचा निरोप घेऊन हा मी चलतोंच तुमच्याबरोबर. बाबासाहेब, आईसाहेब, तुमची माझी ओळख नाहीं. तुम्हांला झाली ही गोष्ट खरी वाटणं सहाजिक आहे. तुमच्या देवतातुल्य मुलीला यामुळें फार दुःख होईल आणि कदाचित् ती माझा तिरस्कारहि करील. पण यावेळीं मला अधिक कांहींच बोलतां येत नाहीं. न्यायासनासमोर योग्य तो निर्णय होईलच. आतां माझी तुम्हां सर्वांना हात जोडून इतकीच विनंति आहे कीं, मी कोणीहि असो, माझ्यामुळं तुम्हांला त्रास झाला याबद्दल मला क्षमा करा. मी तुमचे उपकार कधींहि विसरणार नाहीं.

[ राग—बागेश्री, ताल—त्रिताल ]

**तुला ना आपुल्या प्रेमा । विजय**
**वरित अजय प्रेम । करित जाण**
**जगता पुण्यधाम प्रेमा ॥ ध्रु० ॥**
**विसरत मन दुःखभार सारा ।**
**त्यासि मिळे जरी अन्य आसरा ।**

**नुरत भाव दुसरा । गाजवी सुनामा ॥ १ ॥**

( सुलभा आईच्या खांद्यावर डोकें ठेवून रडत असते. माधवराव कपाळाला हात लावून बसतात. भोलाराम खिन्न मुखानें बाजूला उभे रहातात. चटपटे व गुंडोपंत आपापसांत कांहीं ठरवतात. पोलीस सुहासला पुढें घालून नेऊं लागतात. )

**चटपटे :** ( जातांजातां गुरकावून ) अरे हट्! मास्तरड्या, आला मोठा हट् करायला !

**भोला० :** जा, जा, तोंड घेऊन जा आतां ! भंगड्या, ध्यानांत ठेव कीं, परमेश्वर सत्याचा वाली आहे. ( गुंडोपंत, पोलीस, सुहास, चटपटे जातात.)

**माध० :** पोरी, काय केलंस हें ? कुठला पाहुणा आणलास घरांत ? आज केवढा आनंदाचा दिवस पण त्या आनंदाचा सारा विरस झाला ! तो पाहुणा खराखुरा चोर होता कीं साव, कांहींच लक्षांत येत नाहीं. डोकं फिरून जायची वेळ आली. ( मथुअक्कास ) चल आंत, थोडी आरारूटाची लापशी तरी करून दे. ( पत्नीसह आंत जातो. )

**सुलभा :** ( भोलारामास ) मास्तर, काय होईल हो आतां ? तुम्हांला सुहासांविषयीं संशय येतो का ?

**भोला० :** छेः, मुळींच नाहीं.

**भैरू० :** ( येऊन ) ताईसाब, मस्नीबी त्ये पाव्हन्याविशीं संशाव येत नाय. त्यो फार संभावित दिसतो पगा.

**भोला० :** मला वाटतं या सर्व कारस्थानाच्या मुळाशीं कांहीं तरी दगाफटका असला पाहिजे. ( इतक्यांत ज्यांनीं सुहासला तेथें आणून टाकलें होतें ते दोघे इसम एका बाईला घेऊन येतात. )

**१ ला इसम :** बाईसाहेब, त्या सुहासला आम्ही इथंच आणून टाकलं.

**२ रा इसम :** होय, बाईसाहेब, हाच तो बंगला ! इथं चौकशी करा, आम्ही जातों. ( ते दोघे जातात. ) ( राधाबाई–गुंडोपंताची बायको–पुढें येऊन इकडे तिकडे पहात असते. )

**सुलभा :** काय हो बाई, काय पाहिजे तुम्हांला ? कोण तुम्ही ? कुणाला शोधतां ?

**राधा० :** मुली, इथं सुहास नांवाचा कुणी तरुण आला होता का ?

**सुलभा :** आला नव्हता पण त्याला मूर्च्छित अवस्थेंत इथं टाकण्यांत आलं होतं.

**राधा० :** कुठं आहे तो आतां ?

**सुलभा :** त्याला पोलिसांनीं चोरीचा आरोप ठेवून आत्तांच पकडून नेलं. त्याच्या खिशांत सोन्याच्या बांगड्या सांपडल्या.

**राधा० :** हो ग, तोच तो. त्याच्याच शोधासाठीं मी आल्यें आहें. त्या बिचाऱ्यावर चोरीचा आळ घेतला आहे तो मेला माझा...( संशयानें इकडे तिकडे पहाते. )

**सुलभा :** कांहीं संशय मनांत आणूं नका. हीं आमच्या विश्वासांतलीं माणसं आहेत.

**राधा० :** पण नको बाई, भिंतीला सुद्धां कान असतात.

**सुलभा :** मग चला तर आंतल्या माझ्या खोलींत. तिथं शांतपणानं मला सर्व हकीकत सांगा. मला त्या तरुणाबद्दल फार सहानुभूति वाटते.

**राधा० :** मेल्यांनीं त्याला किती मारलं म्हणून सांगूं ? तो आपला हाडापिंडाचा बळकट म्हणून जिवंत राहिला ! आतां कशी आहे त्याची प्रकृति ?

**सुलभा :** आतां ठीक आहे.

**राधा० :** मुली, त्याच्या मारेकऱ्यांची मला चांगलीच खोड मोडायची आहे. करशील का तूं मला मदत ?

**सुलभा :** अवश्य करीन. पण आतां वेळ मोडूं नका. सर्व सर्व सांगा मला.

**राधा० :** चला तर—( आंत जातात. )

**—पडदा—**

# २

[ **स्थळ**:—पिंपळगांवची चावडी. बाहेरची बाजू. एक पोलीस पहारा करीत आहे. आंतून गाण्याचा आवाज ऐकूं येतो. पोलीस गाणें ऐकतांना तल्लीन होतो.]

**गुंडोपंत** : ( प्रवेश करून ) काय हवालदार, अगदीं दंग झालेले दिसतां? कसल्या रंगांत एवढे दंग झालांत ?

**पोलीस** : आमचा कसला आला आहे रंग ? रंग तुमचा ! तुम्ही या गांवचे सर्वाधिकारी ! तसं म्हटलं तर त्या रंगू नायकिणीच्या रंगमहालांत तुम्ही यावेळीं दंग होऊन रंग उडवीत असायचे, मग इथं कसे ?

**गुंडो०** : वाटलं पाहुण्यांची चौकशी करावी जातां जातां !

**पोलीस** : पाहुणे ? कोण पाहुणे ?

**गुंडो०** : काल इथं तुम्ही चोरीच्या आरोपावरून पकडून आणलेत ते ! केव्हां पोंचविणार त्यांना शहरकोतवालींत ?

**पोलीस** : पोंचवूं आज ! जमादारसाहेब त्याच कामासाठीं शहरांत गेले आहेत.

**गुंडो०** : बरं, पाहुण्यांची काय हालहवाल आहे ?

**पोलीस** : त्या पाहुण्यांची ना ? फक्कड हालहवाल आहे. त्याला कसलीच काळजी दिसत नाहीं. तो या चावडींत म्हणजे तुरुंगांतच आहे म्हणायचा ! पण त्याच्या मुखावर दुःखाची छटासुद्धां दिसत नाहीं. गातो काय, हंसतो काय, आनंदांत आहे बेटा ! तुरुंग म्हणजे त्याला घर वाटतं जसं कांहीं ! ( गाणें ऐकूं येतें. ) ऐका नीट. तोच गातो आहे आंत ! इथं पुष्कळ चोर येतात. पण असा आनंदी चोर माझ्या कांहीं पहाण्यांत नाहीं !

**गुंडो॰ :** त्याला कसलं आलं आहे हो दुःख ? निर्ढावलेला चोर आहे तो. त्याला घर नि बंदिघर सारखंच !

**पोलीस :** पण क्षमा करा हं. हा गृहस्थ कांहीं तुम्ही म्हणतां तसा निर्ढावलेला चोर दिसत नाहीं. त्याच्यावर आमच्या जमादारसाहेबांचा पूर्ण विश्वास दिसतो. त्यांनीं त्याला आंतल्या बाजूस असाच मोकळा ठेवला आहे. त्यांनींच त्याला खायलाप्यायला आणून दिलं; आणि शहरांत जातांना मला सांगितलं कीं, पाहुण्याला कांहीं त्रास देऊं नकोस म्हणून ! केवळ कर्तव्य म्हणून इथं पहारा करतों आहें झालं !

**गुंडो॰ :** बरं, त्याला इथं कोणी भेटायला आलं होतं का ?

**पोलीस :** अजून तर कुणी आलं नाहीं–पण कुणी चांगलीं माणसं आलीं, तर त्याची भेट घेऊं द्यायलाहि जमादारसाहेबांची परवानगी आहे.

**गुंडो॰ :** अस्सं ! बरं तर ! मी वकिलाला घेऊन येतों थोड्या वेळानं ! पोलीसदादा, तुम्हाला तुमच्या हिताची गोष्ट सांगून ठेवतों. त्याच्यावर फाजील विश्वास टाकूं नका. हातावर तुरी द्यायचा एखाद वेळीं. धर्म करतां कर्म ओढवेल तुमचं ! नोकरी जायची ! बरं, मी जातों. ( पोलिसाच्या कानांत कुजबुजतो. तों दुसऱ्या बाजूनें राधाबाई आपल्या मुलीसह–सिन्धूसह येते. तिथं गुण्डोपंताला पहातांच ती बाजूला होऊन लपते. सिन्धूहि जाणार इतक्यांत गुण्डोपंताला तिची चाहूल लागते. तो मागें वळून पहातो. )

**सिंधु :** ( आई दिसत नाहींसें पाहून ) आई, अग आई—

**गुंडो॰ :** कोण ? सिन्धु ? तूं कशी इथं ? आणि आई म्हणून कुणाला हांक मारलीस ? तुझी आई आली आहे कीं काय तुझ्याबरोबर ?

**सिंधु :** ( चाणाक्षपणानें ) आई ? कोणती आई ? कशाची आई ? कुणाची आई ?

**गुंडो॰ :** कुणाची आई ?

**सिंधु :** हो, कुणाची आई ? या पोलीसदादांची ?

**पोलीस॰ :** माझी आई कशाला येईल इथं ? यांचीच असेल !

**गुंडो०** : माझी ?

**सिंधु०** : तुमची होय ? कोणती तुमची आई ? तुम्ही काल घरीं आणली होतीत ती ? ती कशी छान आहे नाहीं ? कशी पण नट्टापट्टा करून आली होती ! आणि डोळे तरी कसे लाल लाल दिसत होते !

**गुंडो०** : फाजील पोर कुठली ! तिचे डोळे लाल दिसत होते काय ?

**सिंधु** : मला जें दिसलं तें मी सांगितलं. बाबा, यांत मी फाजीलपणा काय केला हो ?

**गुंडो०** : फाजीलपणा काय केला ? थांब, तुझं थोबाड रंगवून लाल करतों म्हणजे येईल काय तें ध्यानांत ! ( तिच्यावर हात उगारतो. )

**पोलीस** : ( त्याचा हात धरून ) कां उगाच मुलीला मारतां ? काय केलं तिनं ?

**गुंडो०** : काय केलं ? अहो, काय सांगूं आणि कसं सांगूं ? तुम्ही गांवचे राखणदार, तुम्हांला सर्व ठाऊकच आहे. तुमच्यापासून लपवण्यांत काय अर्थ आहे ? अहो, ती आपली, त्या पलीकडच्या लाल महालांतली रंगू, तिला या कारटीनं माझी आई ठरविलंन् ! बोला, या कारटीनं यापेक्षां आणखी फाजीलपणा तो कोणता करायचा ? तोंड फोडलं पाहिजे कारटीचं !

**पोलीस** : ( मिस्किलपणें ) मुली, खरंच चुकलीस तूं ! ती रंगू किती संभावित...

**गुंडो०** : असं तुम्हीच म्हणतां म्हणून बरं आहे ! आणि अशा त्या संभावित बाईची ही कारटी चेष्टा करते. काय पोलीसदादा, आहे ना ती रंगू संभावित ?

**पोलीस** : वाः, काय सांगावं ? रंगू कशी झाली तरी नायकीण आहे आणि नायकीण म्हणजे संभावित बायको ! मुली, ती संभावित बायको आहे.

**सिंधु** : कुणाची बायको ? बाबांची ? अय्या, मला नव्हतं बाई हें ठाऊक !

**गुंडो०** : काय हें पोलीसदादा ? तुम्हीसुद्धां माझी चेष्टा करतां अं ? निदान पोरीच्या देखत तरी अशी चेष्टा करूं नका ! पोरं बिघडतात अशानं !

**पोलीस** : गांवांतल्या चामुंडा नायकिणीला खुशाल घरीं नेतां, त्यानं नाहीं पोरं बिघडत आणि मी जरा चेष्टेनं बोललों तर त्यानं पोरं बिघडतात अं ?

आमच्या जमादारसाहेबांना या असल्या गोष्टींची फार चीड आहे आणि म्हणून ते तुमच्यावर फार चिडले आहेत !

**गुंडो०** : काय म्हणतां ? म्हणजे तेच आमचा खटला बिघडविणार कीं काय ?

**पोलीस** : तसं नव्हे हो ! ते कायद्यापुढं काय करणार म्हणा, पण आपलं सांगून ठेवतों.

**गुंडो०** : तें बरं केलंत. मी सावधच राहीन. माझा पुरावा भक्कम आहे. चोर हा चोर ठरलाच पाहिजे. कायदा माझ्या बाजूचा आहे आणि जमादार कायद्याच्या बाजूचे आहेत, असंच ना ? मग नको भीति ! सिन्धु, बाळ, खरं सांग, तूं मघाशी आई म्हणून कुणाला हांक मारलीस ?

**सिंधु०** : मी ? आईला हांक मारली ? केव्हां ? बाबा, तुम्हांला कसला तरी भास झाला !

**गुंडो०** : मला भास झाला नाहीं ! खरं सांग, तूं आई म्हणून कां म्हणालीस मघाशीं ?

**सिंधु** : बाबा, खरं सांगूं ? आत्तां आठवलं मला. मी नुस्तं आई नाहीं म्हटलं, अयाई म्हटलं ! पायाला ठेंच लागली तेव्हां मी अयाईग असं म्हटलं असेल !

**गुंडो०** : अयाई नव्हे, चांगलं आई म्हटलंस तूं. तुझी आई इथंच कुठं तरी लपली असेल ! मला भीति वाटतेच आहे तिची !

**सिंधु** : कुणाची ? माझ्या आईची भीति वाटते तुम्हांला ? बाबा, तुम्ही आईला भितां !

**पोलीस** : काय, हे एवढे गुण्डोपंत आणि बायकोला भितात ? ( हंसतो. )

**गुंडो०** : हंसूं नका. ती तशीच जहांबाज आहे. या कारटीवरून तुम्हांला तिची परीक्षा झालीच असेल म्हणा ! ही चिमुरडी पोर जर इतके तीनतेरा करत्ये आहे तर तिच्या आईचं विचारायलाच नको ! बायको आहे ना ती लग्नाची ?

**पोलीस** : लग्नाची बायको ना ? मग कशाला एवढे भितां ? लग्नाची बायको म्हणजे ताटाखालचं मांजर !

**गुंडो०** : कसलं मांजर घेऊन बसलांत ? वाघीण आहे वाघीण ! बोलूं देत नाहीं मुळीं. मी एक शब्द बोललों कीं, ती उलट फाड् फाड् दहा शब्दांनी

उत्तरं देते ! काल सहज रंगीला घेऊन घरीं गेलों, तों आली अंगावर चवताळून !

**पोलीस :** ( मिस्किलपणें ) मग खूप गंमत उडाली असेल, नाहीं ?

**सिंधु :** ( रडत ) कसली गंमत पोलीसदादा ! त्या रंगीटलीनं आणि यांनीं माझ्या आईला मार मार मारलं !

**गुंडो० :** कारटे, काय सांगत्ये आहेस हें यांना ? मी मारलं ? मी मारलं ?

**सिंधु :** हो, हो, तुम्ही मारलंत ! बाबा, तुम्हीं माझ्या आईला मारलंत ! त्या वेळीं आईचं ओरडणं ऐकून जर तो बिचारा कोणसा धांवून आला नसता...

**गुंडो० :** कारटे, काय सांगतेस हें पोलिसाला ? आतां तोंड आवरतेस का तें फोडून काढूं ? ( सिंधूला मारायला धांवतो. )

**सिंधु :** ( भीतीनें बाजूला होत ) आई, धांव ग धांव ! आई—आई—

**राधा० :** ( पुढें येऊन आणि मुलीला पोटाशीं धरून ) बाळ, भिऊं नकोस. ( गुंडोपंतास ) मारा पाहूं कशी पोरीला मारतां तें ! पोलीस पाहताहेत म्हटलं ! फाडून खाईन तुम्हांला यांच्या देखत ! होऊं द्या मग काय व्हायचं तें ! माझा संतापसुद्धां अनावरच झाला आहे. त्या मसणीच्या नादानं काल मला मारलंत तें मारलंत पण वर त्या बिचाऱ्या सुहासनां सुद्धां मारलंत ! कांहीं लाज वाटते का बोलायला ?

**गुंडो० :** माझी लाज काढतेस ? भर चावडींत माझी लाज काढतेस ? बायको तूं, नवऱ्याची लाज काढायला लाज नाहीं वाटत ?

**राधा० :** नवरे–नवरे ! किती दिवस लाज धरायची तुमची ? आतां डोक्यावरून पाणी गेलं. भरल्या घरांत नायकिणी आणतां आणि लग्नाच्या बायकोवर हात टाकतां ? आणि ते बिचारे सुहास मला सोडवायला आले तर त्यांनाहि मारतां ? नाहीं आतां मला हें सहन होत ! काय व्हायचं असेल तें होऊं दे; साऱ्याचा सोक्षमोक्ष होईल तेव्हांच गप्प बसेन. नवरे, नवरे ! नवरे कसले तुम्ही ? कसाब आहांत कसाब !

**गुंडो० :** यांत मी कसाईपणा काय केला ? केवढा मान आहे तिला समाजांत ! तिची कलेची सेवा फार थोर आहे. तिचं गाणं म्हटलं कीं, संभावित लोकांची नुस्ती झुंबड उडते. अग, ती माझी मैत्रीण आहे.

**राधा० :** आग लागो तुमच्या जिभेला! नायकिणीला मैत्रीण म्हणायला लाज नाहीं वाटत?

**गुंडो० :** बघ, पुन्हा काढलीस तूं लाज माझी! आजच्या सुधारलेल्या काळांत अशा मैत्रिणी जोडणं कमीपणाचं समजत नाहींत.

**राधा० :** ही सुधारणा का? दाखवा मला असले सुधारक! त्यांची भर चव्हाट्यावर फट्फजिती नाहीं केली तर नांवाची राधाच नव्हे! चांगलीं देवाब्राह्मणांच्या साक्षीनं लग्न लावतां आणि मग असल्या मैत्रिणी जोडतां? दाखवा, दाखवा मला ते सुधारक! निर्लज्ज, बेशरम, निलाजरे, बायकोचा गळा कापणारे गळेकापू...

**गुंडो० :** ( नाइलाजानें हात जोडीत ) माझ्या आई, भर चावडींत तरी माझी अब्रू घेऊं नकोस. हे पोलीसदादा—

**राधा० :** पोलीसदादांचा दंडुका दिसतोय् म्हणूनच तुम्ही वरमून बोलतां आहांत! नाहीं तर मला जिवंत जाळली असतीत!

**गुंडो० :** अग, कांहीं विचार कर. तूं माझी लग्नाची बायको ना? आणि तूंच भर चावडीवर नवऱ्याची अब्रू—

**राधा० :** कसली हो तुम्हाला अब्रू? नवरे आहांत हें खरं, पण अब्रूनं राहिलां असतांत तर कशाला ऊर फोडून बोलल्यें असत्यें? डोक्यावरून पाणी गेलं, साऱ्याचा कळस झाला, नाहीं आतां मला रहावत, मी चावडीवर उभी राहून अश्शी ओरडून सांगणार...

**गुंडो० :** ओरड, कैदासिणी, खुशाल ओरड. हवा तर ओरडून ओरडून प्राण दे. त्या चोराविरुद्ध माझा पुरावा बळकट आहे. लग्नाची बायको पडलीस आणि तशांत हे पोलीस इथं! नाहीं तर...पण जाऊं द्या. त्या चटपटे वकिलाला घेऊन येतों. मग पाहतों तुझा तो यार...

**राधा० :** ( संतापानें ) काय म्हणालांत?

**गुंडो० :** हो, हो, तो यार आहे तुझा! त्याशिवाय नाहीं उगाच खुशाल घरांत घुसला! आतां मीहि चिडलोंच आहें. वाटेल तो पुरावा उभा करीन पण तुम्हां दोघांचा एकदांचा निकाल लावीन. हा गुंडोपंत या गांवच्या

गुंडांचा राजा आहें. मला नाहीं कुणाची भीति ! पोलीस झाले नि न्यायाधीश झाले तरी पुराव्यापुढें काय करणार ? हा चाललोंच मी चटपट्यांकडे ! जी नवऱ्याची अब्रू संभाळीत नाहीं ती बायको कसली ? हा चाललोंच मी !

**सिंधु :** ( गुंडोपंताच्या पायाला विळखा घालून ) बाबा, कुठं चाललांत ? माझ्या आईवर कांहीं संकट तर आणीत नाहीं ना तुम्ही ? नका जाऊं, मी नाहीं सोडणार पाय !

**गुंडो० :** ( सिंधूला लाथाडून ) चल, हो दूर, मर कारट्ये ! ( जातो. )

**राधा० :** ( तिला सांवरून ) बाळ, कशाला त्यांचे पाय धरल्येस ? रडूं आंवर ! ( तिला कुरवाळून रडते. )

**पोलीस :** बाई, रडूं नका. मुलीला घेऊन घरीं जा. मी सर्व पाहून ठेवलं आहे. कांहीं काळजी करूं नका. देवाच्या दयेनं सारं कांहीं ठीक होईल.

**सिंधु :** पोलीसदादा, तुमचाहि देवावर विश्वास आहे का ?

**पोलीस :** माझा देवावर विश्वास आहे आणि म्हणूनच मी पोलीसचं काम अंगावर घेतलं आहे. मी थोडक्यांत सांगतों तें ऐकून ठेवा. मीहि समाजाचा गरीबसा सेवकच आहें. देव न्यायाचा नि सत्याचाच पाठीराखा असतो.

**सिंधु :** पण तो देव कुठं आहे हो ?

**राधा० :** बाळ, काय विचारते आहेस हें भलतंच ? देव सर्वांमध्यें आहे; तुझ्यांत आहे, माझ्यांत आहे, या पोलीसदादांतहि आहे.

**सिंधु :** आणि बाबांच्यांत ?

**राधा० :** त्यांच्याहि अंतःकरणांत देव आहे पण तो अजून जागा झालेला नाहीं. आतां हा देवाबद्दलचा वाद पुरे. आपल्या दैवांत काय लिहिलेलं आहे तें आधीं आपण पाहूं या. पोलीसदादा, तुम्ही इतके सज्जन नि दयाळु असाल असं मला वाटलं नव्हतं आणि म्हणून मी भीत भीतच इथं आल्यें. आपली सोबत असावी म्हणून पोरीला बरोबर घेऊन आल्यें इतकंच.

**पोलीस :** पण तें फार चांगलं केलंत. ज्या ज्या गोष्टी आतांपर्यंत माझ्या कानावर आल्या त्यांवरून माझी खात्री झाली आहे कीं, सुहास निरपराधी आहेत हें सिद्ध करायला या मुलीच्या साक्षीचा फार चांगला उपयोग होईल. मुली, कोर्टांत जाऊन तूं देशील का साक्ष ?

**सिंधु :** साक्ष म्हणजे काय हो ?

**पोलीस :** तिथं तुला जें विचारतील त्याला उत्तर द्यायचं !

**सिंधु :** हात्तिच्या ! इतकंच ना ? पण मी आधींच सांगून ठेवत्यें, मी खोटं नाहीं हो बोलायची ! आणि खरं तें सांगायला कुणाच्या बापालाहि भ्यायची नाहीं.

**पोलीस :** तुझ्या स्वतःच्या सुद्धां ?

**सिंधु :** माझ्याच काय, देवाच्या सुद्धां बापाला नाहीं भ्यायची !

**पोलीस :** अस्सं, अस्सं ! ( हंसतो. )

**सिन्धु :** हंसतां हो काय असे पोलीसदादा ? खरं बोलणं हें इतकं कठीण का आहे ?

**पोलीस :** कठीण नाहीं फारसं. पण खरं तेंच सांगेन, खोटं बोलणार नाहीं अशी आधीं शपथ घ्यावी लागते तिथं.

**सिन्धु :** खरं तें खरं, त्याला शपथ काय करायची ? खऱ्याची शपथ, खोट्याची शपथ, असे का कांहीं प्रकार आहेत ?

**पोलीस :** मुली, तूं अजून लहान आहेस, निष्पाप आहेस; तुला नाहीं कळायचे ते प्रकार ! ( राधाबाईस ) बरं पण बाई, तुम्ही इथं कां आलां होतां तें नाहीं सांगितलंत !

**राधा० :** इथं तुम्ही चोर म्हणून अडकवून ठेवलं आहांत ना, त्यांना—सुहासनां भेटण्यासाठीं !

**पोलीस :** बरं आहे, भेटा तर त्यांना ! चला आंत, त्यांना कोठडींतून बाहेर बोलावून घेतों. जमादारसाहेब येईपर्यंत गांठीभेटी उरकून घ्या, कारण ते आले म्हणजे सुहासनां शहर–कोतवालींत पाठवावं लागेल !

**राधा० :** पण मी त्यांना एकटी कशी भेटूं ? मला बाई भीति वाटते.

**पोलीस :** तुम्हांला आणि कोणाची भीति वाटते ? खरं नाहीं वाटत ! एवढा तुमचा तो नवरा कर्दनकाळ पण त्याला सुद्धां मघाशीं फाड् फाड् बोललांत, मग हे सुहास तर गरीब सज्जन, त्यांना भिण्याचं काय कारण ?

**राधा०** : ते पुण्यवान आहेत, देवमाणूस आहेत. त्यांचे आम्ही अपराधी आहोंत. आमच्यामुळंच ना त्यांच्यावर चोरीचा आळ आला ? त्यांना मीं कसं तोंड दाखवूं ?

**सिंधु** : ( पलीकडे पहात ) आई, तीं पाहिलींस का कुणी माणसं इकडे येताहेत ! कोण ग तीं ?

**राधा०** : तीं ना ? अग, तींच तीं ! त्यांचीच मी वाट बघत्यें आहें. ( पुढें होऊन ) या, या, सुलभाताई. कित्ती उशीर झाला हा यायला ?

( सुलभा, भोलाराम आणि भैरू येतात. )

**सुलभा** : काय सांगूं राधाबाई ? आमच्या घरांत भानगडीच भानगडी सुरू झाल्या आहेत. त्या मेल्या चटपट्यानं नानातऱ्हेच्या खोट्यानाट्या गोष्टी सांगून बाबासाहेबांचं मन कलुषित करून टाकलं आहे.

**राधा०** : कोण हो हा चटपटे ?

**सुलभा** : आहे एक वकील !

**भोला०** : साधा वकील नव्हे, भानगडगल्लींत रहाणारा भानगडी वकील ! आमच्या शहरांत शेंकड्यावारी वकील आहेत आणि त्यांत पुष्कळ चांगलेहि आहेत; पण या वकिलाची जातच निराळी ! सापाची जात आहे त्याची !

**भैरू** : कसली सापाची जात घेऊन बसलांया ? साप तसा वंगाळ खरा पुन् मोठं जिवाणूं ! चटपट्याची जात इचवाची हाय. जीव इवलासा पुन् नांगी मारन्यांत पटाईत ! चटपट्या इचू हाय इचू ! एक दिस त्येची माजी जरा बाजूला गांट तर पडूं द्या, त्येची नांगी नाय् चिमट्यांत धरली तर नांव बदलीन !

**सुलभा** : आणखी त्यांत वाईट असं कीं, तो या खटल्यांत तुमच्या यजमानांना मदत करणार आहे म्हणे !

**राधा०** : अगबाई, मग अनर्थच ओढवला म्हणायचा ! ती एक वेश्या आहेच मेली माझं घर बुडवायला टपलेली आणि त्यांत हा वकिल मिळणार ! वेश्या नि वकील यांची ही जोडी—

**पोलीस** : तुम्ही मुळींच घाबरूं नका. तुमची बाजू सत्याची असेल तर कुणीहि कांहींएक वांकडं करूं शकणार नाहीं तुमचं. माझी खात्री आहे कीं, न्यायमंदिरांत तुम्हांला न्यायच मिळेल. चांगला भक्कम पुरावा मात्र गोळा करा.

**राधा०** : तें काम माझं ! सुहासनां सोडविण्यासाठीं मी त्या वेश्येचेहि पाय धरीन, आणि खरं बोलायला सांगेन तिला.

**सुलभा** : काय, तुमचा अजून वेश्येवर विश्वास आहे !

**राधा०** : कां नसेल ? किती झालं तरी ती बाई आहे, स्त्री आहे. माझी करुण कहाणी ऐकून तिचं मन द्रवल्याशिवाय रहाणार नाहीं.

**भोला०** : असं झालं तर दुधांत साखर पडेल. तीहि खटपट करूं या आपण.

**राधा०** : मास्तर, तुम्ही याल का माझ्याबरोबर त्या रंगूच्या घरीं ?

**भोला०** : हो–हो, अवश्य येईन ! तशांत मी म्हातारा, मला हो कसली भीति ?

**राधा०** : मग चला तर आपण तिकडेच जाऊं.

**सुलभा** : आणि या मुलीला कुठं ठेवणार तुम्ही ? मला वाटतं, तुम्ही दोघंहि हा खटला संपेपर्यंत आमच्याच घरांत येऊन रहा. मुलीला आमच्या घरीं ठेवा नि तुम्ही मास्तरांना घेऊन लागा त्या खटपटीला.

**राधा०** : चला तर मास्तर, चल ग सिंधु—

**पोलीस** : अहो पण तुम्ही सुहासची भेट घेणार होतां ना ?

**राधा०** : मला त्यांना तोंड दाखवायची लाज वाटते. ते निर्दोषी म्हणून सुटले म्हणजे मग घेईन त्यांची भेट ! सुलभाताई, तुम्ही मात्र त्यांची भेट घ्या हं. ताई, तुम्ही प्रत्यक्ष देवता आहांत. तुम्ही देवी आणि ते देवमाणूस !

**भोला०** : ही जोडी छान जमेल एकंदरींत. ही माझी बाळ देवता आणि ते सुहास देव. जशी कांहीं लक्ष्मीनारायणाचीच जोडी !

**सिंधु** : होय का ? मग मी या लक्ष्मीनारायणांना आरती ओंवाळीन, बरं का ?

[ राग–मिश्र काफी, ताल–धुमाळी ]

**मी ओंवाळिन यांना । अशी पहा ।**
**उजळिन प्रेमानें शुभ मंगल निरांजना ॥ ध्रु० ॥**

**मग लाजुनि नव नवरी । ही हंसेल**
**खुद्कनशी । नव नवला । ही मौज**
**नवी नयना ॥ १ ॥**

**भैरू :** तूं त्येस्नी वंवाळनार? लई ब्येस, म्हंजी अवंदा आमच्याकडे दिवाळसन साजरा व्हनार म्हंगा की!

**सुलभा :** भैरू, फार वाह्वलास तूं!

**भैरू :** खरं हाय तायसाब तुमचं म्हननं! आदीं त्ये चटपट्याचा शिमगा संपल्याबिगर कसा सुहासचा दिवाळसन यनार?

**सुलभा :** आतां पुरे कर तुझी थट्टा. ही थट्टेची का वेळ आहे? राधाबाई, तुम्ही आपल्या कामाला लागा कशा!

**भोला० :** चला राधाबाई मुलीला घेऊन. ( तो राधाबाई नि सिंधु यांना घेऊन जातो. )

**पोलीस :** ( सुलभेला ) चला आंतल्या बाजूला कोठडीकडे. भैरू, तूं इथंच्च पलीकडे उभा रहा बरं का?

**भैरू :** पोलीसदादा, त्येवडा तुमचा दांडका मस्नी घेऊनशान् जा. कुनी आला की त्येला दांडकूनच काढतों. फार छान हाय तुमचा दांडका!

**पोलीस :** बरं, बरं, उभा रहा तिकडे! ( भैरू पलीकडे जातो. आंतील कोठडीचा देखावा दिसूं लागतो. पोलीस सुलभेला बाहेरच्या बाजूस उभी करतो व तो आंत सुहासला आणायला जातो. )

**सुलभा :** देवा, त्या सुहासनां संकटमुक्त कर हीच तुझ्या चरणीं माझी प्रार्थना आहे.

[ राग—मांड, ताल—दादरा ]

**प्रभु संकट हें निवार । सेवाव्रताला**
**वरिलें ज्यानें । जनता जो मानि देव**
**सहतो मग का तो शोकभार ॥ ध्रु० ॥**
**जरि जनता हाचि देव । प्रभु का**
**धरि अन्य भाव । विनति पदीं**
**घे धांव ॥ करि करुणा देवा दयाळा ॥ १ ॥**

( पोलीस सुहासला बाहेर आणतो. )

**पोलीस** : सुहास, या सुलभाताई तुम्हांला भेटायला आल्या आहेत. लौकर काय तें बोलून घ्या. जमादारसाहेब तुम्हांला शहरकोतवालींत नेऊन दाखल करण्यासाठीं इतक्यांत येतील. तिथंच तुमच्यावरचा खटला नोंदला जाणार आहे. ( पलीकडे जातो. )

**सुहास** : ( सुलभेस ) बाई, तुम्ही कां इथं येण्याची तसदी घेतलीत ? आधींच तुम्ही माझ्या डोक्यावर उपकारांचा डोंगर ठेवला आहे आणि त्यांचा पर्वत करायचा तुमचा विचार आहे वाटतं ? मी एक गरीबगुरीबांची सेवा करणारा गरिबाहूनहि गरीब असा समाजसेवक आहें. बाई, तुम्हां श्रीमंतांनीं डोक्यावर ठेवलेलं उपकारांचं ओझं पेलण्याची शक्ति माझ्यांत कुठून असणार ? कां, बोलत कां नाहीं ? भेटायला आलांत नि मुक्या कां बनलांत ? त्या गुंडांनीं दिलेला मुका मार मी कसाबसा सहन केला पण हा तुमचा मुका मार...

**सुलभा** : इश्श ! ( बाजूला तोंड करून जरा दूर जाऊन उभी रहाते. )

**सुहास** : आत्तां समजलों. तुम्हांला माझ्या बोलण्याचा राग येणं सहाजिक आहे. तुम्ही केवढ्या श्रीमंत, केवढ्या थोर ! केवढा मोठा दर्जा तुमचा आणि तुम्हांला मी नुसतं बाई म्हटलं तेव्हां तुम्हांला त्याचा राग येणं सहाजिकच आहे. बाई, सुलभाबाई नव्हे सुलभाबाईसाहेब, राग सोडाल का गरिबावरचा ?

**सुलभा** : नाहीं सोडायची !

**सुहास** : नाहीं सोडायची ? कुणाला नाहीं सोडायची ? मला ?

**सुलभा :** इतक्या भयंकर संकटांत तुम्ही सांपडला आहांत तरी तुम्हांला थट्टाविनोद सुचतो ना ? मला फार राग आला आहे तुमचा !

**सुहास :** बाईसाहेब, कारण तर सांगाल रागाचं ?

**सुलभा :** खरं सांगा, मी बाईसाहेब का आहें तुमची ? तुमची सेवाचाकरी केल्यामुळें मी तुमची सेविका झाल्यें नाहीं का ? मी सेविका, मला नको बाई, बाईसाहेब म्हणूं ! सेविकेच्या पदवीला शोभेल असंच माझं नांव घ्या !

**सुहास :** ( हंसून ) कसं नांव घेऊं ? साधं कीं उखाण्यासह ?

**सुलभा :** पुरे झाली ही थट्टामस्करी ! आधीं सांगा तुमच्या पाठींतली कळ थांबली का ?

**सुहास :** ( स्वगत ) आतां हें बोलणं थट्टेवारीच नेलं पाहिजे मला ! ( उघड ) पाठींतली कळ थांबली पण...

**सुलभा :** ( घाबऱ्यानें ) अगबाई, मग दुसरीकडे कळ उद्भवली कीं काय ? मेली काय माझी अक्कल तरी ? गरम पाण्याची पिशवी सुद्धां बरोबर नाहीं आणली मीं !

**सुहास :** ही नवी कळ गरम पाण्यानं नाहीं बरी व्हायची ! नुस्त्या हस्तस्पर्शानंच ती बरी होईल ! ( तिचा हात धरून हृदयावर ठेवीत ) ही पहा इथं कळ...

**सुलभा :** सोडा माझा हात. हात धरणं सोपं असतं पण तो कायमचा धरून ठेवणं फार कठीण असतं ! तुम्हां पुरुषांना सारी मेली थट्टाच वाटते पण त्यांत आम्हां स्त्रियांचं मात्र मरण ओढवतं !

**सुहास :** कशाला हव्यात इतक्यांत मरणाच्या गोष्टी ? या खटल्यांत मला फार फार तर वर्ष सहा महिन्याची शिक्षा होईल. चोरीच्या आरोपावरून मी कांहीं फांशीं जात नाहीं—

**सुलभा :** कुठचं बोलणं कुठं नेलंत तुम्ही हें ? इडापिडा टळो आणि अमंगळ पळो ! नको तुम्हांला फांशीची शिक्षा व्हायला कधीं !

**सुहास :** वेळच आली तर फांशी टळणार आहे का ? मी अंगावर घेतलेलं समाजसेवेचं व्रतच तसं खडतर आहे. खेडेगांवांत काम करायचं म्हणजे

माराला नि मरणाला सदा सिद्धच असलं पाहिजे. शहरांत नागरिकांशीं गांठ पडते, पण इथं खेड्यापाड्यांत सदा गांवगुंडांशीं—ग्रामकंटकांशीं झगडावं लागतं. ग्रामकंटक, गांवगुंड हे फार पुरातन शब्द आहेत. जे लोक शहरांतल्यापेक्षां खेडेगांवांतलं समाजसेवेचं काम अधिक सोपं आहे असं समजतात ते चूक करतात. इथं नेहमीं कंटकांशीं गांठ! हे कांटे केव्हां पायांत बोंचतात तर केव्हां हृदयांत सुद्धां रुतून बसतात! खेडेगांवांतलं सेवेचं काम—ग्रामोद्धाराचं व्रत म्हणजे सुळावरची पोळीच!

[ राग—अडाणा, ताल—त्रिवट ]

**ना गणा जीवना। सुखाचें ॥**
**दिनरातीं प्राणपणानें सुखवाया**
**झटें जनांना ॥ ध्रु० ॥**
**पदीं टोंचती कांटे। चलतां भय नेटे ॥**
**कोणि न देत अभयवरदाना ॥ १ ॥**

**सुलभा :** पण आतां या सुळाच्या नि फांशीच्या गोष्टी पुरे नाहींत का झाल्या? दुसरं कांहीं चांगलं बोलाल कीं...

**सुहास :** तें काय बोलूं, बाईसाहेब?

**सुलभा :** हं, पुन: म्हटलंत मला बाईसाहेब! सांगितलं ना एकदां कीं, मला नांवापुरता सुद्धां साहेबाचा स्पर्श खपत नाहीं म्हणून? नुसतं साधं सुलभा म्हणा मला. सुलभ हें नांव जड का आहे इतकं?

**सुहास :** सुलभ हें नांवच अगदीं सुलभ आहे. त्यांत शब्दाचा सुद्धां जडपणा नाहीं. सुलभ...

**सुलभा :** अत्तां कसं गोड बोललांत पण! पुनः म्हणा....

**सुहास :** सुलभ, सुलभ—वाहूं का सुलभसहस्रनाम तुझ्या गोड नांवावर?

**सुलभा :** पुरे झाली ही थट्टा! तुमच्यावर जें संकट कोसळलं आहे त्याचा आधीं नको का गंभीरपणें विचार करायला?

**सुहास :** मग कसं म्हणतेस? गंभीर होऊं? बरं तर, हा झालों गंभीर, अगदीं दगडासारखा गंभीर! ( तशी मुद्रा करतो. )

**सुलभा :** काय हें ? मी कशाला आल्यें आणि तुम्ही हें काय सारं थट्टेवारी नेतां ?

**सुहास :** अग, असेच आम्हांला सारे कठीण प्रसंग थट्टाविनोद करीत साजरे करावे लागतात. लहान तोंडीं मोठा घांस घेऊन बोलतों त्याची तूं मला क्षमा कर. सुलभ, तूं लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी यांचीं चरित्रं वाचलींच असशील ! अत्यंत कठीण प्रसंगीं त्यांनीं थट्टाविनोद करून स्वतःला क्लेशांचा विसर पाडून घेतला आहे. त्या विभूतींच्या तुलनेनं मी अगदीं लहान, कृमिकीटकासारखा, पण मलाहि त्यांच्या थोर चरित्रापासून थोडा बोध घ्यायला नको का ?

**सुलभा :** हो, पण तुमची या चोरीच्या आरोपांतून मुक्तता कशी होणार ? कुणी चांगला वकील–बॅरिस्टर...

**सुहास :** त्यांची नाहीं गरज ! जिथं मुळांत आरोपच मुळीं खोटा आहे, तिथं तो टिकणार कसा ? मी सांगून ठेवतों तें ऐक; एकदां चौकशी सुरू झाली कीं, आपोआप माझ्या बाजूचा सर्व पुरावा गोळा होऊं लागेल ! परमेश्वराच्या अतर्क्य लीलेवर श्रद्धा ठेव आणि शांत चित्तानं नुसती गंमत पहात रहा !

[ राग–जिल्हामांड–ताल–धुमाळी ]

**नाहीं मिति उपकार अती । तव थोर**
**कृति मी वानुं किती गे ।। ध्रु० ।।**
**दैवयोग कीं घडलि संगती । कुंठित करिते**
**माझी मति ।। १ ।। जनसेवारति भुलवि**
**मम मति । भणंग मी फिरतों जगतीं ।। २ ।।**
**नकोत मायापाश कुणाचे नकोत मजला**
**नव नातीं ।। ३ ।। सुलभ जरी का**
**विसरुनि जा मज । मान्य सुदति करिं**
**मम विनती ।। ४ ।।**

**सुलभा :** पण देवाची अनुकूलता व्हायला—

**सुहास** : देवावर श्रद्धा ठेवली पाहिजे.

**सुलभा** : आणि तशीच माणसानं श्रद्धेला प्रयत्नांची जोड दिली पाहिजे.

**सुहास** : तेंहि होईल. ( इतक्यांत जमादार नि गुंडोपंत येतात. )

**जमादार** : होईल, होईल, तेंहि होईल. मी आतां कैद्याला शहरकोतवालींत नेऊन हजर करतों, तिथं तुम्ही या आणि काय तें सांगा. माझं नका डोकं खाऊं इथं !

**गुंडो०** : पण जमादारसाहेब, माझं थोडं ऐकून तर घ्याल आधीं ? जरा बाजूला या, या चोराच्या देखत नको.

**जमादार** : गुंडोपंत, हा जमादार चोरटं बोलणं ऐकून घेत नाहीं हें लक्षांत ठेवा. आतां आमचं पोलीसखातं झपाट्यानं सुधारत आहे. आमच्या खात्यांत अलीकडे सुशिक्षितांची भरती होऊं लागली आहे हें तुम्हांला माहीतच आहे. आम्ही पोलीस पोटासाठीं नोकरी करीत असलों तरी आमचं मुख्य कर्तव्य समाजाचं रक्षण करणं आहे हें आम्हांला विसरतां येत नाहीं. आपला समाज जर आमच्याकडे समाजरक्षक म्हणून पाहूं लागेल तर समाजांत माजलेल्या कंटकांना दूर झटकून टाकणं फार सुलभ होईल. ( पाहून ) तुम्ही कोण ?

**सुलभा** : मी सुलभ ! आमच्याच घरीं तुम्ही सुहासनां पकडलंत !

**जमा०** : खरंच कीं ! हो, पण प्रसंग पडला तर सुलभाताई, तुम्हांला कोर्टांत साक्षीदार म्हणून यावं लागेल हें आहे ना ध्यानांत ? तुम्हीच आपल्या इथं चोरीचा आरोप ठेवलेल्या गृहस्थाला आश्रय दिलांत, होय ना ? हे गृहस्थ...

**गुंडो०** : हे गृहस्थ नाहींत जमादारसाहेब, चोरीच्या मुद्देमालासह सांपडलेला हा चोर आहे.

**जमा०** : तें अजून सिद्ध व्हायचं आहे. यांनीं चोरी केली हें पुराव्यानिशीं न्यायदेवतेसमोर सिद्ध होईपर्यंत हे एक सद्‌गृहस्थच आहेत !

**गुंडो०** : हे सद्‌गृहस्थ ? कपाळ माझं ! ( कपाळावर हात मारतो. )

**सुहास** : कशाला इतक्यांत आपल्या कपाळावर हात मारून घेतां ?

**सुलभा** : घेऊं देत, म्हणजे निदान पुरा कपाळमोक्ष व्हायचं तरी टळेल !

**गुंडो०** : ( संतापानें ) हें तुमचं टोळकं कां जमलेलं आहे तें आलं माझ्या ध्यानांत ! मला काय तुम्ही मूर्ख समजलांत ? बेअकली समजलांत ?

**सुहास** : आम्ही कोणालाच कांहीं समजत नाहीं. लोक काय समजायचं तें समजतीलच योग्य वेळीं ! तुम्ही मूर्ख असाल तर लोक तुम्हांला मूर्ख समजतील, तुम्ही बेअकली असाल...

**गुंडो०** : जमादारसाहेब, ऐका, नीट ऐका, हा चोर मला शिव्या देतो आहे !

**जमा०** : पण तुम्ही चांगले शहाणे असून कां ऐकायला उभे रहातां इथं ? तुम्ही जाऊन कोतवालींत माझी वाट पहात रहा म्हणून मीं मघाशींच सांगितलं, पण तुम्हीच ऐकत नाहीं !

**गुंडो०** : बरं, बरं, पाहून घेईन ! मला कमी लेखूं नका असे. मी या गांवचा मोठा वजनदार गृहस्थ आहें. माझ्या नांवाला इथले लोक थरथरां कांपतात !

**जमा०** : पण आतां ते तुमचे दिवस झपाट्यानं संपुष्टांत येऊं लागलेले आहेत, हेंहि न विसराल तर त्यांत तुमचंच हित होईल !

**गुंडो०** : बरं, बरं, माझं हित कळतं मला. मी कांहीं कुणी गाढव नाहीं ! ( तिरमिरीनें निघून जाऊं लागतो. )

**सुहास** : ( उपहासानें ) काय, तुम्ही आणि गाढव ?

**गुंडो०** : ( परतून ) काय म्हणालास चो–रा– ?

**सुलभा** : हे नाहीं स्पष्ट बोलले, पण मी मात्र तुम्हाला म्हणत्यें—

**गुंडो०** : काय ? काय ?

**जमादार** : काय हें गुंडोपंत ? कशाला उगाच ऐकून घेतां ते शब्द ? जा आतां, झाली शोभा तेवढी पुरे नाहीं का झाली ?

**गुंडो०** : ( मिशीवर ताव देत ) बरं आहे, पाहून घेईन, पाहून घेईन ! ( जातो तों आंत येणाऱ्या भैरूवर आपटतो. )

**भैरू०** : काय पाहून घ्येनार र तूं ? अं ? ( अस्तन्या मागें सारतो. गुंडोपंत पळ काढतो. ) काढ पळ ल्योका ! पुन् सांपडशील पुना कवां तरी माज्या तावडींत ! मी वलकला तुस्नी–( दांतओंठ खातो. )

**जमादार** : हां, ही चावडी आहे, गप्प बैस. कोण तूं ?

**सुलभा** : हां माझा नोकर भैरू. दिसतो दाणगट पण आहे मोठ्या हळव्या मनाचा ! भैरू–

**भैरू** : जी तायसाब !

**सुलभा** : बैस मुकाट्यानं !

**भैरू** : व्हय् जी ! ( स्वतःच्या तोंडावर हात दाबतो.)

**जमादार** : पोलीस—

**पोलीस** : ( येऊन ) काय साहेब ?

**जमादार** : चला, सुहासनां बरोबर घेऊन शहरकोतवालींत चला. चला सुहास–मीहि येतों तुमच्याबरोबर.

**सुहास** : चला, मी तयारच आहें. ( जातां जातां ) सुलभ, न्यायदेवता कोणताहि निकाल देवो, मी निरपराधी आहें हें लक्षांत ठेव. मी जातों. सुटका होतांच तुला भेटायला आणि तुम्हां सर्व देवमाणसांचे आभार मानायला येईन.

[ सुलभ दुःखाकुल होते. जमादार आंत जाऊन आणि कागदपत्र घेऊन येतात व पोलीस पुढें, मागें सुहास, त्यांच्यामागें आपण स्वतः, अशा प्रकारें जातात. ]

**सुलभा** : भैरू, काय होईल रे आतां ?

**भैरू** : काय बी नाय ! न्याव मिळल सुहासस्नी ! द्येव डोळ मिटूनश्यान् नाय पगत जगाकड !

**सुलभा** : तुझीहि देवावर श्रद्धा आहे ना ? पण तुझीच काय, आम्हां सर्वांचीच देवावर श्रद्धा आहे. देवावर श्रद्धा हें आम्हां हिंदूंचं–मग तो हिंदु उच्च समजला जात असो कीं वेडेपणानें नीच मानला जात असो–आमचं सर्वांचं ब्रीदच आहे.

[ इतक्यांत भोलाराम, राधाबाई नि रंगू नायकीण यांसह येतो. ]

**भोला०** : ( सुलभेस ) बाळ, कुठं आहेत सुहास ? नि तूं अशी खिन्न कां ?

**भैरू** : त्येंना जमादारसाब कोतवालींत घ्येऊनश्यान् इकत्यांत गेलेया.

**रंगू** : काय, ते गेले ? मला त्यांची भेट घ्यायची होती !

**सुलभा :** ( निरखून पाहून ) तुम्ही त्या रंगूबाई कीं काय ? काय सांगणार होतां त्यांना भेटून ?

**रंगू :** मी त्यांचे पाय धरणार होत्यें, त्यांची क्षमा मागणार होत्यें मी. राधाबाईनीं मला सारं सारं सांगितलं, तेव्हां माझे डोळे उघडले ! मला 'माझ्या नीच धंद्याबद्दल पश्चात्ताप होतो आहे. काय हें आमचं जिणं ? आमच्यामुळं तुम्हां साध्वींच्या भरल्या घरांना आग लागते ! आम्ही पातकी, आम्ही पैशासाठीं...

**सुलभा :** पैशासाठीं ? बाई, मी देत्यें तुला वाटतील तेवढे पैसे ! पण प्रेमळ मनाच्या स्त्रीजातीला कलंक लावणारं हें नीच काम सोडून दे. हे घे तुला माझे दागिने ! ( दागिने काढूं लागते.)

**रंगू :** नकोत मला तुमचे दागिने !

**राधा० :** मग माझे घे. ( ती दागिने काढूं लागते. )

**रंगू :** तुमचेहि नकोत ! तुमचे दागिने घेऊन मी कुठल्या नरकाचं साधन करूं ? ( पायां पडते. ) मला क्षमा करा. मी तुमची वाट चुकलेली बहीण आहें.

[ इतक्यांत चटपटे येतो व तें दृश्य पाहून चमकतो. ]

**चटपटे :** हा काय प्रकार चालला आहे इथं ? कोण ही ? रंगी ! रंग्ये...

**रंगू :** कोण तुम्ही ? चटपटे ? ( त्याला पकडायला धांवते—तो पळून जाऊं लागतो. )

**भोला० :** अरे हट् ! भंगड्या...( चटपटे पळतो. )

**रंगू :** पकडा, पकडा त्याला. त्या मेल्याची इथंच चांगली शोभा करत्यें.

**भैरू :** असं व्हय ? ह्यो आनतों त्येला पकडूनश्यान् ! कुटं जातो ल्येकाचा पळून ? ( जाऊं लागतो. )

**भोला० :** जाऊं दे त्याला. पळून पळून जाणार कुठं तो ? येईल वेळ त्याचीहि ! भैरू, आपल्याला दुसरीं पुष्कळ कामं आहेत.

**भैरू :** बरं जी !

**सुलभा :** ( रंगूला मिठी मारून ) बाई, तुम्हांला पश्चात्ताप झाला, तुम्ही पवित्र झालांत. आमच्या धर्मानं पश्चात्ताप हेंच सर्वांत श्रेष्ठ प्रायश्चित्त सांगितलं आहे. होय ना मास्तर ?

**भोला०** : आमच्या धर्मानं अशीं कितीतरी उच्च तत्त्वं सांगितलीं आहेत, पण त्यांकडे लक्ष देतो कोण ?

**सुलभा** : पण मी तर देत्यें ना ? तुमच्या शिकवणीच्या बाहेर मी कधीं गेल्यें आहे का ?

**भोला०** : बाळ, तूं आदर्श मुलगी आहेस. बी. ए. पर्यंत शिकलीस तरी सद्धर्माची चाड बाळगतेस आणि माझ्यासारख्या जुन्यापुराण्या गुरूची शिकवण मानतेस. तूं स्वतः धन्य आहेसच पण तूं मलाहि धन्य केलंस !

**सुलभा** : तें बोलूं काय तें मागाहून. आधीं या रंगूताई—माझ्या भगिनी—काय सांगतात तें ऐकूं या.

**रंगू** : पण तें इथं चावडीवर नको. चला, कुठं तरी बाजूला चला म्हणजे सांगत्यें सगळं. बोलूनचालून ही चावडी !

**राधा०** : खरं आहे तुमचं म्हणणं, आणि तशांत...

**भोला०** : हें गुंडोपंताचा दबरा असलेलं गांव. चला माझ्याबरोबर, मी नेतों तुम्हाला अगदीं एखाद्या बाजूच्या ठिकाणीं ! चला—( जातात. )

— पडदा —

# ३

[ रा. ब. माधवराव संतोषे यांच्या बंगल्यांतील प्रशस्त दिवाणखाना. मध्यभागीं खुर्च्या–टेबल मांडण्याचें काम भैरू करीत आहे. भैरू तोंडानें 'तुझी माझी जोडी । साकरे बिगर गोडी ।। जशी घोडी लगाम तिला नाहीं । निघे लगीन–वरात लवलाहीं ।।' ही लावणी गुणगुणतो. ]

**माधव०** : ( बाहेर येत ) अरे ए भैरू, हें तुझं वरातीचं रडगाणं बंद कर पाहूं.

**भैरू** : धनीसाब, माप करा अं ! ये वरातीचं गाणं रडगाणं कसं ? तुमीच कानांत सांगितलंया की आज तायसायबांचं लगीन हाय म्हून ! मग वरात...

**माधव०** : वरात कशाला हवी ? सुलभचं लग्न अगदीं साहेबी थाटानं करण्याचा माझा विचार ठरला आहे. या लग्नांत वरात नाहीं, भटभिक्षुक नाहींत, होम नाहीं, कांहीं नाहीं. माझ्या सुलभचं लग्न अगदीं साहेबी थाटांत पार पडणार !

**भैरू** : नसना ती वरात ? पुन् बेण्डबाजा नि वाजंत्री तर येत्याल ?

**माधव०** : नो बेंडबाजा, नो गाजावाजा ! अगदीं पुरा साहेबी थाट !

**भैरू** : काय बेंडबाजा बी नाय, वाजंत्री बी नाय, मग रडगानं व्हनार खरं सारं !

**माधव०** : नो, नो, नो ! नो रडगाणं ! पुरा साहेबी थाट ! जांवई पण जांवई, कसा फक्कड शोधून काढला आहे ? चटपटे वकीलासारखा जांवई घरीं चालून आला आहे !

**भैरू** : मंग त्यो हथंच घर करूनश्यान् राह्‌नार की काय ? म्हंजी ब्येस, सारी दुनियेंतली भानगड हथंच घर करून बसायची !

**माधव०** : बोलूं नकोस असं कांहीं वेडंविद्रं ! हें लग्न झालं कीं, भानगडच मिटेल !

**भैरू** : ती कोणती ?

**माधव०** : त्या सुहासची ! चोर लेकाचा, माझ्या घरांत पाहुणा म्हणून शिरून भानगड उपस्थित करूं पाहतो, नव्हे का ? बरं, पण हार आणलेस का तीन ?

**भैरू** : व्हय् ! पुन् तिन कुनास्नी ?

**माधव०** : एक नवरीला, दुसरा नवऱ्याला नि तिसरा...

**भैरू** : भटास्नी !

**माधव०** : भटाला नव्हे मूर्खा, साहेबाला. माझ्या सुलभचं लग्न साहेब लावणार !

**भैरू** : म्हंजी, सायब लगीन बी लावतुया ? सायबाला काय आनखी कामं नायती ? त्यो भटाच्या पोटावर बी पाय ठेवनार ?

**माधव०** : साहेब तो साइब, तो सर्व कांहीं करणार ! नीट पहा कसं तो लग्न लावतो तें ! जा आंत, तिला म्हणावं, जरा बाहेर येऊन जा.

**भैरू** : बरं जी ! ( जातो. )

**माधव०** : आज हा रावबहादुर धन्य होणार ! अगदीं साहेबी थाटानं मुलीचं लग्न केल्याबद्दल उद्यां वृत्तपत्रांतून माझ्यावर अभिनंदनाचा वर्षाव होणार !

**मथू०** : ( येऊन ) कशाला बोलवायचं झालं इकडे ?

**माधव०** : मथू, आतां मी तुझा ' इकडे ' नाहीं ! आतां मी तुझा हबी म्हणजे साहेबी भाषेंतला नवरा आहें.

**मथू०** : तुम्ही हबी, हबी ? इश्श ! आज काय झालंय् तुम्हांला ?

**माधव०** : माझ्या अंगांत पुरापुरा साहेब संचारला आहे. मी माझ्या मुलीचं लग्न साहेबी थाटानं लावणार ! पण तुझ्यासारख्या अडाणी नि गांवढळ बायकोला त्यांतली मजा काय कळणार म्हणा ! खरं सांगूं ? तूं अडाणी, जुन्या जमान्यांतली ! मथू, तूं मला वाईफ शोभत नाहींस !

**मथू०** : म्हणजे ? डोकं फिरलं कीं काय तुमचं ? माझ्या उरावर एखादी नव्या युगांतली फटाकडी पोर सवत म्हणून नाचविण्याचा तर तुमचा विचार नाहीं ना ?

**माधव०** : तेंहि केलं असतं ! पण या वयांत पहिली बायको जिवंत असतांना जर दुसरं लग्न केलं तर लोक माझ्या तोंडांत ×× घालतील ! मी पुरा साहेब नाहीं, मी अर्धा साहेब आहें. नाहीं तर तुझ्याशीं घटस्फोट करून...

**मथू०** : काय, मला टाकणार तुम्ही ? सोडा त्या गोष्टी ! चांगला देवाब्राह्मणां-समक्ष हात धरला आहे तुमचा ! पण मी साफच विचारत्यें, कोण देणार आहे तुम्हांला या वयांत मुलगी ?

**माधव०** : आतां मुली द्याव्याघ्याव्या लागत नाहींत. त्या कितीहि शिकल्या तरी म्हाताऱ्यांच्या गळयांत आपण होऊन येऊन पडतात ! पण हा नसता वाद पाहिजे कशाला ? मी कांहीं लग्न करीत नाहीं दुसरं ! पदरीं पडली नि पवित्र झाली !

**मथू०** : कोण ?

**माधव०** : तूं !

**मथू०** : ती जुनी म्हण असली तरी खोटी आहे. आम्हांला पदरांत टाकून पवित्र करावं लागलेलं नाहीं. आमचीं लग्नं लहानपणीं पवित्र असतांनाच लागलेलीं आहेत !

**माधव०** : पण म्हणतों ना, पुरे हा वाद !

**मथू०** : पण मीं थोडाच वाद उकरून काढला आहे ? आज इकडे डोकं फिरलं आहे ना ? तुम्हीच काढलात वाद ! कशानं फिरलं डोकं ?

**माधव०** : आज मी सुलभचं लग्न साहेबी थाटानं लावणार आहें. साडे पांचाच्या ठोक्याला चटपटे वकील लग्नाची नोंद करून घेणाऱ्या साहेबाला घेऊन येणार आहेत. सरकारी कागदावर सुलभ आणि चटपटे यांच्या नवरा-बायको म्हणून सह्या झाल्या कीं, झालं लग्न !

**मथू०** : पण या गोष्टीला सुलभेची संमति आहे का ?

**माधव०** : आहे, तिची पूर्ण संमति आहे.

**मथू०** : मला न कळवतां ही अशी लग्नाची घिसाडघाई करण्याचं कारण ?

**माधव०** : अग, आज त्या चोराच्या खटल्याचा निकाल आहे ना ? तो चोर सुटला तर काय घ्या ? तुमच्या सर्व कारवाया मला त्या चटपट्यानं

सांगितल्या आहेत. चोराशीं नको माझ्या मुलीचं लग्न व्हायला ! शिकलेली पोर, चोरसुद्धां पसंत करायची ! मग गेली कीं नाहीं माझी अब्रू ?

**मथू०** : आणि चटपट्यासारख्या भानगडी वकिलाचे सासरे होऊन जशी कांहीं अब्रू वाढणारच आहे इकडची ?

**माधव०** : वाद नको, सांगतों ना ? कसलाहि वाद नको आज ! गप्प बैस तूं आणि मुकाट्यांनं जें जें होईल तें पहा !

**मथू०** : कां गप्प बसूं मी ? मी सुलभची आई आहें. पोर येऊं दे, विचारत्येंच तिला खडसून !

**माधव०** : विचार, खुशाल विचार. काय वाटेल तें कर, तिचा विचार बदलणं शक्य नाहीं ! बरं, मी थोडा वेळ बाहेर जाऊन येतों. ( जातो. )

**मथू०** : काय बाई तरी हल्लींच्या पोरी ? पोरटीनं मला दादसुद्धां लागूं दिली नाहीं ! हें कसलं लग्न ? साहेब म्हणे लग्न नोंदणार ! जें जें ऐकावं तें नवलच. देवा, तूंच पोरीला सुबुद्धि दे.

[ राग–पिलू, ताल–दादरा ]

**प्रभो दे निवारा दयाळा । देई मुलीला**
**सुविचार आतां ॥ न कळे कशी ही**
**आली कुवेळा ॥ ध्रु० ॥**
**विपरीत कैशी मति ही जनांची ।**
**भुलती मोहें कुमतीला । आधार**
**दे देवा अम्हांला ॥ १ ॥**

**सुलभा** : ( घाईनें येते आणि हातांतली बॅग नि छत्री टाकून कोंचावर पडते.) आई, फार फार गंमत झाली बघ कोर्टांत !

**मथू०** : कोर्टांत ? तूं कोर्टांत का गेली होतीस ? आणि ती कशाला ?

**सुलभा** : साक्ष द्यायला ! सुहासवरचा खटला चालला आहे ना ? मी ठाम सांगत्यें, सुहास चोरीच्या आरोपांतून सुटणार, दोषमुक्त होणार !

**मथू०** : बरं होईल बाई ! फार चांगला आहे तो बिचारा !

**सुलभा** : तुझंसुद्धां चांगलं मत आहे ना त्यांच्याविषयीं ? मग छान ! तुझी नाहीं काळजी उरली मला !

**मथू०** : एक काळजी संपली तरी दुसरी काळजी दत्त म्हणून उभी राहिली आहे ना ? ते म्हणतात, आज इथं तुझं त्या चटपट्याशीं लग्न होणार आणि तुझी म्हणे त्याला संमति आहे ? पोरी, हा तुझा विचार निदान मला तरी पसंत नाहीं !

**सुलभा** : होय ना ? मग फारच छान ! आई, तूं गप्प बसून जें जें होईल तें पहा. मी आज खरीच गंमत उडवून देणार आहें.

**मथू०** : पण......

**सुलभा** : पण नाहीं नि बीण नाहीं ! तूं माझी काळजी मुळींच करूं नको. मी जें करीन तें तुला खास आवडेल !

**मथू०** : नाचा, हवीं तशीं नाचा ! मी जात्येंच कशी ! ( आंत जातां जातां ) बहकल्या ग बाई आत्तांच्या पोरी ! पण तिला तरी काय बोल लावायचा ? बाप तशी पोर पण उगाच माझ्या जिवाला मात्र घोर ! ( जाते. )

**सुलभा** : इथपर्यंत तर छान जुळलं आणि पुढचं सुद्धां जमेलच !

[ राग–पहाडी–ताल–धुमाळी ]

**सहजचि जुळेल हा शुभ योग ।**
**जातील लया सकल संकटें ।**
**सरतिल सारे भोग ॥ ध्रु० ॥**
**शुद्ध धरूनी भावना ती । करित**
**कार्या शुभ मानी ॥ जात भीति**
**भंगुनी ती आणिल जय संयोग ॥१॥**

[ इतक्यांत राधाबाई धाबऱ्या धाबऱ्या येतात. ]

**राधा०** : ताईसाहेब, ताईसाहेब, मला लपवा बाई कुठं तरी !

**सुलभा** : लपवूं ? कां लपवूं मी तुम्हांला ? असं झालं तरी काय ? आणि अशा कां दिसतां ? बसा पाहूं आधीं इथं कोंचावर स्वस्थपणें !

**राधा०** : माझी साक्ष झाली नि मी परत यायला निघाल्यें. ते माझी भेट घेण्याच्या विचारांत होते. ते माझ्या मागून निघाले. ते मला पकडणार तों मी गर्दीत निसटल्यें आणि धांवतच इथं आल्यें. लपवा मला ताईसाहेब !

**सुलभा** : मग त्यांत घाबरायला काय झालं ? ते इथं येतील इतकंच ना ? येऊं द्या त्यांना. तुम्ही कांहीं इथं रानांत पडलेल्या नाहीं. मी आहें ना ? मुळींच घाबरू नका !

**राधा०** : तशी मी घाबरत नाहीं हो ! पण उगाच तुमच्या घरांत तोंडं वाजायचीं आणि प्रकरण हातघाईवर सुद्धां यायचं ! शिवाय, लपून राहून मला त्यांचीहि गंमतच करायची आहे ! लपूं का त्या खोलींत ? पण ते आलेच तर त्यांना कांहीं दाद लागूं देऊं नका हं !

**सुलभा** : बरं तर, लपा तिथं. पण मी पुन्हा सांगून ठेवत्यें, इथं तुम्हांला कुणालाहि—नवऱ्याला सुद्धां घाबरण्याचं कारण नाहीं.

**राधा०** : तशी घाबरायला मी कांहीं लाजरी नवी नवरी नाहीं त्यांची ! अगदीं झगडून त्यांच्याशीं उभा जन्म काढला आहे.

**सुलभा** : पण हो, सिन्धु कुठं आहे ?

**राधा०** : तिला भोलाराम मास्तरांच्या स्वाधीन केली आहे. ते खटला संपल्यावर तिला आणि सुहासनां इकडेच घेऊन येणार आहेत.

**सुलभा** : म्हणजे सुहास सुटणार अशी तुम्हांला खात्रीच वाटते तर ?

**राधा०** : सुहास खात्रीनं सुटणार आणि तिकडचे चांगलेच दांत पडणार !

**सुलभा** : हें कशावरून म्हणतां तुम्ही ?

**राधा०** : माझी साक्षच तशी झाली. मी जेव्हां कोर्टांत न घाबरतां फाड् फाड् उत्तरं दिलीं तेव्हां ते मोठे साहेबसुद्धां आनंदानं डोलूं लागले ! ताईसाहेब, खोटं कधीं टिकेल का ? माझी साक्ष झाली नि कोर्टाला मधली सुटी झाली तेव्हां त्या झेंडे वकिलांनीं माझ्याजवळ येऊन मला शाबासकीसुद्धां दिली ! कित्ती चांगला आहे हो तो झेंडे वकील ? सत्याचा वाली दिसतो. ( बाहेर दार वाजल्याचा आवाज येतो. ) हें पहा, कुणीतरी येत आहे ! लपत्येंच आतां ! ( लपते. )

**गुंडो०** : ( येऊन ) कुठं आहे माझी बायको ?

**सुलभा** : बायको ? असेल नवऱ्याजवळ ! बायका नेहमीं नवऱ्याजवळ राहतात एवढंहि नाहीं का तुम्हाला ठाऊक ?

**गुंडो०** : अहो, मीच तिचा नवरा ना ? बोला, माझी बायको कुठं आहे ?

**सुलभा** : छे, तुम्ही नाहीं नवरे !

**गुंडो०** : काय, मी नवरा नाहीं ?

**सुलभा** : नवरे असतांत तर नसती का तुमची बायको तुमच्याजवळ ?

**गुंडो०** : हें पहा, हें डावपेंचाचं बोलणं सोडा आणि माझी बायको माझ्या स्वाधीन करा. तुम्ही माझ्या बायकोला लपवून ठेवलं आहे याचा परिणाम चांगला होणार नाहीं.

**सुलभा** : कुणाला धमकावणी देतां ? हें तुम्हां गांवगुंडांचं खेडेगांव नाहीं, हें म्हटलं शहर आहे. इथं असल्या धमकावण्यांना आम्ही भीक घालीत नसतों. मुकाट्यानें चालते व्हा इथून, नाहीं तर भैरूला बोलावून धक्के मारून घालवीन तुम्हांला ! भैरू, अरे भैरू ! चांगला सोटा घेऊन ये बाहेर लौकर !

**गुंडो०** : येऊं दे, भैरू येऊं दे, भैरव येऊं दे नाहीं तर खुद्द काळभैरव येऊं दे, मी खून पाडीन त्याचा इथं ! मी नवरा, लग्नाच्या बायकोला न्यायला आलों आहें, मला नाहीं कोणाच्या बापाची भीति ! हां !

**भैरू** : ( सोटा घेऊन येतो ) कुनाचा रे ल्येका बाप काढतोस ? आं ? ह्ये पाह्यलंस का काय त्यें ? एका फटक्यांत मुडदा पाडीन तुझा ! ल्येका... ( सोटा सरसावतो. )

**गुंडो०** : अरे सोड या गमज्या ! मीच तुझा आणि ती बायको सांपडली तर तिचासुद्धां इथल्या इथं मुडदा पाडीन !

**सुलभा** : काय, तुम्ही बायकोचाहि खून कराल ?

**गुंडो०** : कुणाची आहे मला भीति ? ती माझी लग्नाची बायको आहे. तिला हात लावायला मला तुमचीच काय पण तुमच्या बापाचीहि भीति नाहीं !

**भैरू** : पुना काडलास बाप ! अतां मातुर त्वांड संभाल ! ( तो सोटा उगारतो, राधाबाई येऊन तो पकडते. )

**राधा०** : भैरू, हो मागं ! ( गुंडोपंतास ) काय करणार तुम्ही माझं ? खून करणार माझा ?

**गुंडो०** : हो, हो, खून सुद्धां करीन तुझा ! मी तुझा लग्नाचा नवरा आहें ! ( तिचा हात पकडून तिला ओढूं लागतो. )

**राधा०** : मोठे आले नवरे खून करायला ! सोडा हात ! ( हिसका देऊन हात सोडवते. ती मागें होतांच सुलभा पुढें येऊन त्यांच्यामध्यें उभी रहाते. )

**सुलभा** : काय मांडलं आहे तुम्ही हें ? व्हा दूर !

**गुंडो०** : ( दचकून मागें हटत ) तुम्ही मागं व्हा, तुम्ही मागं व्हा !

**राधा०** : पण तुम्ही कां मागं मागं हटतां आहांत ? भ्यालांत ? या देवतेच्या उग्र स्वरूपाला भ्यालांत ? ही मीच पुढं आल्यें मुळीं ! काय करणार हो माझं तुम्ही ? आजपर्यंत नवरे म्हणून पुष्कळ छळ सोसला तुमचा ! तुमचा छळ सोसून सोसून मीहि चांगली निगरगट्ट बनल्यें आहें. भागूबाईसारखे मागं कां सरलांत ? व्हा पुढं, करा माझा खून ! या शहरांतल्या लोकांनाहि कळूं द्या, खेडेगांवांतले खवीस बायकोचा कसा छळ करतात तें !

**गुंडो०** : खूनच करीन तुझा, पण इथं नको. पोलीस घेऊन येतों, बायकोचा ताबा घेतों आणि मग...

**राधा०** : आतां नका पोलिसांच्या गोष्टी सांगूं. त्यांनाहि चांगलं कळलं आहे तुमचं चरित्र ! डोळे उघडले आहेत आतां सगळ्यांचे !

**गुंडो०** : बरं आहे, मीहि आतां हट्टालाच पेटलों आहें. आधीं त्या चोराचा निकाल लागूं दे, मग तुझा ! माझ्या विरुद्ध साक्ष दिलीस काय ? लग्नाची बायको आणि नवऱ्यावर उलटलीस ?

**राधा०** : बायको, बायको, बायको ! हो, मी आहें तुमची बायको पण म्हणून काय मी तुमच्या खोट्यानाट्या लबाड्यांची पाठीराखीण होऊं ? सावाला चोर ठरवूं ? तुमचं चरित्र आतां चागलं जगापुढं आलं आहे ! आतां तुमचीं पातकं तुमच्यावर उलटलीं आहेत, त्यांतून सुटका करून घेण्यासाठीं तुम्हांलाच यावं लागेल माझ्या पायां पडत !

**गुंडो०** : काय, बायकोच्या पाया पडूं ? पुरुष आहें का कोण आहें मी ?

**राधा०** : दिसलं तुमचं पौरुष त्या कोर्टांत ! आणखी सुद्धां शोभा होणार आहे तुमची ! ती तुमची रंगी तुमच्याविरुद्ध साक्षीला उभी राहिली कीं, होतील डोळे पांढरे ! आत्तां आहे तिची साक्ष आणि मग लागलाच निकाल !

**गुंडो०** : ( दांतओंठ खात ) काय, ती रंगीहि उलटली ? बरं झालं, वेळेवर कळलं मला. जातोंच मी ! ( जाऊं लागतो. )

**राधा०** : जा खुशाल ! सगळा बंदोबस्त नीट आहे. जा, पण पायां पडत येऊं नका हं ! डोळे चांगले उघडले म्हणजे मग माझेच पाय धरायला याल ! मग नाहीं बरं क्षमा करायची ! सांगून ठेवत्यें.

**गुंडो०** : क्षमा ? कोण, मी क्षमा मागणार आणि बायकोची ? पण असल्या भाकड गोष्टी बोलायला मला वेळ नाहीं. आधीं जातों आणि त्या रंगीचा निकाल लावतों ! ( जातो. )

**राधा०** : ( सुलभच्या पायाला मिठी मारून रडत ) ताईसाहेब, मला क्षमा करा. माझ्यामुळंच हा अभद्र प्रकार तुमच्या घरांत घडला !

**सुलभा** : ( तिला वर उठवून ) राधाबाई, काय हें ? तुम्ही मला आईसारख्या आहांत ! तुम्ही थोर, मी पोर, माझे काय पाय धरतां ? आपल्या घराच्या आणि संसाराच्या अब्रूसाठीं नवऱ्याचा अनन्वित छळ सोसणाऱ्या तुम्हीच खऱ्या देवता आहांत ! तुम्हां देवतांच्या छळाची आतां परमावधि झाली आहे. आमच्या समाजाचे डोळे उघडूं लागले आहेत. आतां यापुढं तुम्हां देवतांचा छळ थांबणार बघा !

**राधा०** : होय, तुमच्यासारख्या शिकलेल्या बायका जर स्त्रीजातीच्या उद्धारासाठीं धिटाईनं पुढं सरसावल्या तर होईलहि कदाचित् तसं ! आम्ही तर रडून रडून थकलों बाई !

**सुलभा** : आतां रडत बसण्याच्या गोष्टीच सोडून द्या ! आतां आपण स्त्रियाच स्त्रीजातीच्या उद्धारासाठीं लढण्याचा निर्धार करूं या. त्यांत आम्हांला आतां सुहाससारख्या वीरवृत्तीच्या समाजसेवकांचा आधार मिळूं लागला आहे. आतां आपण कां रडावं बरं ?

**राधा०** : खरंच, मी त्या देवमाणसाला आपल्या कर्मकटकटींत अजिबात विसरून गेल्यें. ताईसाहेब, सुटतील ना हो ते ? त्यांची आठवण झाली कीं, मला रडूं आंवरतच नाहीं. ( रडत ) खरंच, सुटतील ना ते ?

**सुलभा** : काय हें राधाबाई ? आतांपर्यंत किती धीरानें वागलांत आणि आतां रडतां ? हें रडं आंवरा पाहूं ! हं–पुसा डोळे !

[ ती राधाबाईचे डोळे पुसते. भैरूहि डोळे पुसतो. माधवराव येतात नि हा प्रकार पहातात. ]

**माधव०** : हा काय चालला आहे रडारडीचा प्रकार ? या रडताहेत आणि भैरू, तूंहि डोळे पुसतो आहेस ! काय, आहे काय हा प्रकार ?

**भैरू** : धनीसाब, माजा गळा अक्षी दाटून आलाया ! माज्यानं नाय बोलवत ! मी जातों. याच सांगतील समदं तुमास्नी ! ( जातो. )

**माधव०** : सुलभ, काय, आहे काय हा सारा प्रकार ? आणि ती कुठं आहे ?

**मथु०** : ( पुढें येऊन ) मीहि आंतल्या बाजूलाच उभी आहें रडत ! काय करूं ? मला बाहेर यायचा धीरच होईना ! माझी बाळ धीट, ती होती इथं म्हणून निभावला प्रसंग !

**माधव०** : कसला प्रसंग ? काय, आहे काय हें सारं ? आणि तशांत आज सुलभच्या लग्नाचा शुभ दिन ! आणि अशा वेळीं तुम्ही रडतां ?

**सुलभा** : बाबासाहेब, बरी आठवण केलीत ! हा माझ्या लग्नाचा दिवस नव्हे का ? बाबासाहेब, क्षमा करा. आम्ही रडं आंवरतों. या राधाबाईची रडकथा हळुहळु कळेलच तुम्हांला !

**राधा०** : काय, बाळ ! आज खरंच तुझं लग्न होणार आहे ?

**मथु०** : कसलं लग्न नि कसलं काय ? इकडे म्हातारचळ लागला आहे. ही पोर तरी शहाणपणा दाखवील म्हणावं तर तिनंहि या लग्नाच्या पोरखेळाला संमति देऊन टाकलीन्. काय कपाळीं लिहिलं आहे देव जाणे ! राधाबाई, चला तुम्ही आंत ! चालूंद्यात यांचेच म्हातारचळ नि पोरखेळ !

**राधा०** : पण खरंच का सुलभाताईचं आज लग्न आहे ? कळूं दे तरी मला. नवरा मुलगा कोण ? कुठला ?

**मथु०** : चला आंत, सगळं सांगत्यें तुम्हांला ! तुम्हांला आज फार त्रास झाला आहे बाई. तुम्ही खेडेगांवांत वाढलेल्या दणकट बाई म्हणून जगतां आहांत अशा कहरांत ! मी तर नुसती हबक्यानंच मरून गेल्यें असत्यें. बरं, चला पाहूं आंत. चहा घ्या आधीं थोडा. चला—( तिला घेऊन जाते. )

**माधव०** : मुली, सर्व ठीक आहे ना ? का होणार आयत्या वेळीं घोंटाळा ? मला कांहीं आजचं चिन्ह एकंदरींत ठीक दिसत नाहीं !

**सुलभा** : बाबासाहेब, तुम्ही कांहीं काळजी करूं नका. मी आहें ना खंबीर ? आज माझं लग्न खास होणार !

**माधव०** : होय ना ? मग ठीक ! (घड्याळ पहात) अरे, पांच वाजूनसुद्धां गेले कीं ! आत्तां साहेबाला घेऊन जांवईबुवा येतील. मी हा आलोंच कपडे बदलून ! बाळ, तूं सुद्धां नवा पोषाख कर पाहूं ! आज तुझं लग्न ! बाळ किती गुणाची आहे पण ! बापाच्या आज्ञेंत आहे. देव तुझं कल्याण करील.

**सुलभा** : बाबासाहेब, एवढा तुमचा आशीर्वाद आहे मग माझं कल्याण कां होणार नाहीं ? बरं बाबा, मी लागत्येंच तयारीला—( जाते. )

**माधव०** : भैरू, ए भैरू ! काय विसकटाविस्कट झाली सारी ! (भैरू येतो.) लाव सगळं सामान नीट !

**भैरू** : जी धनीसाब ! ( माधवराव जातात. भैरू टेबलखुर्च्या नीट मांडूं लागतो. तोंडानें लावणी गुणगुणत असतो. चटपटे येतो. )

**चटपटे** : कायरे भैरू, रावबहादुर कुठं आहेत ?

**भैरू** : हायती आमंदी—

**चटपटे** : आणि सुलभा—सुलभा...

**भैरू** : म्हना की ताई ! सुलभाताई ह्ये नांव मस्नी लई ग्वाड लागतंया ! म्हना सुलभाताई, नका आडखळूं !

**चटपटे** : तें नांव मी कसं घेऊं ?

**भैरू** : कां, लाज वाटतीया ?

**चटपटे** : अरे, आज ती माझी बायको होणार ना ? मग तिला मी ताई कसं म्हणूं ?

**भैरू** : त्या तुमची बाईल व्हनार, व्हय ना ? अजूनश्यान् झालेल्या तर नाहींत ना ? मंग लगीन व्हईपरयंत ताई म्हंगाया काय हरकत हाय ?

**चट०** : तूं अडाणी आहेस. तुला नाहीं हे नांवांतले सूक्ष्म भेद समजायचे ! मूर्ख, अडाणी, मठ्ठ, रानटी....

**भैरू** : व्हय ना ? मी अडानी आन् मूरख हाय ना ? तुम्ही श्येने ! मंग ऐकाच या अडान्याचं भाकीत ! अव श्याने, आमची सुलभाताई तुमच्याशीं लगीन लावन्याचं मूरखपन कद्दीं नाय करनार ! काल्या दगडावरची रेघ !

**चट०** : ( संशयानें ) काय रे, म्हणजे इथं कांहीं भानगड झाली कीं काय आमच्या लग्नासंबंधानं ? सांग, खरं सांग काय तें ! भैरोबा, तुम्ही किती चांगले आहांत—( स्व. ) अडला नारायण गाढवाचे पाय धरी !—सगळं खरं खरं सांगा. कांहीं खरोखरच भानगड झाली असेल तर मला तिच्यावर कांहीं तोड तरी काढतां येईल. भैरोबा, असं काय बरं ?

**भैरू** : अरच्या ! मघाशीं मी गाडव मानूस व्हतों तों इकत्यांत ग्वाड मानूस जालों का ? काय म्हंगतां ? ( त्याला बाजूला घेऊन ) अगदीं खरं सांगूं ? देवाच्यान् खरं सांगूं ? आईच्यान्, बाच्यान् ?

**चट०** : होय बाबा !

**भैरू** : बाबा ? अरच्या ! मी येचा बाबाबी जालों कीं ! काय लबाड मानूस हाय ? प्वाटांत शिराया बगतुया ! ( उघड ) खरं सांगूं ना ? मंग ऐकाच तर ! हिरा अन् गारगुटी, साकर अन् मिठाचा खडा, सोन्याचं कडं आन् टिनपाट यांच्यांतला फरक सुलभाताईना कळत नाय् असं का समजता तुम्ही ?

**चट०** : तुझ्या म्हणण्याचा अर्थ नीट नाहीं आला ध्यानांत. अधिक फोड करून सांग.

**भैरू** : अतां काय डोकसं फोडूं तुमच्या पुडं ? अव तुमी गारगुटी आन् त्ये सुहास हिरे, सुहास सोन्याचं कडं आन् तुम्ही टिनपाट...

**चट०** : अस्सं काय ? मी टिनपॉट काय ? खात्रीनं तुम्हीच कुणी तरी सुलभेच्या मनांत माझ्याविषयीं विष कालवलेलं दिसतं. अस्सं काय ? अं ?

**भैरू :** कां वो, खरं सांगितलं तर दांतवठ खातायां ? खऱ्याची दुनया राह्यली नाय ह्येच खरं ! पुन् मस्नी काय करायचं ? त्या सुलभाताई हायती आन् तुमीबी हायतसां ! मस्नी काय करायची तुमची भानगड ? पुन् तसं कशाला ? या सुलभाताईच हकड येत्याती, त्येस्नीच विचारा म्हंजी संशाव फिटल. ( जातो. )

**चट० :** काय करावं, कांहींच सुचत नाहीं. सुलभेला मी विचारलं आणि ती जर कां फटकन् ' नाहीं लग्न करणार ' म्हणाली तर साराच बार फुकट जायचा ! कशी तरी वेळ मारून नेलीच पाहिजे.

**सुलभा :** ( येऊन ) काय वकीलसाहेब, तुम्ही सुहासच्या खटल्यांत कसे पडलांत नाहीं ? आश्चर्य आहे.

**चटपटे :** खरं सांगूं ? तुम्हां सर्वांना वाईट वाटेल म्हणून मी या खटल्या-पासून अलिप्त राहिलों. कसं झालं तरी तुमच्या घरांत मुद्देमालासह सांपडलेला चोर तो ! त्यांत तुमची साक्ष होणार हें ठरलेलंच होतं. मग खरंच सांगा, मी कसा बरं तुमच्या विरुद्ध उभा राहूं ? तुमच्यासाठीं, सुलभ, तुझ्यासाठीं, केवळ तुझ्यासाठीं मला त्या साऱ्या भानगडीपासून दूर रहावं लागलं. खरं सांग सुलभ, तुला ही माझी कृति आवडली ना ?

**सुलभा :** आवडो वा न आवडो, आतां कशाला त्याचा विचार ? माझी आवडनिवड मी बाबासाहेबांच्यावर अवलंबून ठेवली आहे. बाबासाहेबांना जें आवडतं ( माधवराव येतात ) तें मलाहि आवडतें. खरं ना बाबासाहेब ?

**माधव० :** होय बाळ, तूं फार शहाणी मुलगी आहेस म्हणून माझ्या आज्ञेंत राहतेस. बरं पण चटपटे, घड्याळ पाहिलंत का ? साडेपांच वाजायला आले तरी ते नोंदणीसाहेब कसे आले नाहींत ? तुम्ही त्यांना घेऊन येणार होतां ना ?

**चटपटे :** होय, पण ते म्हणाले, तुम्ही पुढं व्हा. त्यांना थोरल्या साहेबानं कचेरींत अडकवून ठेवलं आहे. ते थोड्या उशिरानं येतील पण येतीलच ! आपली सर्व तयारी आहे ना ?

**माधव०** : काय ग सुलभ ? आहे ना तुझी तयारी ? आणि मी म्हणतों, साहेबी थाटाच्या लग्नाला अशी तयारी तयारी ती काय लागते ? नवराबायकोंच्या सह्या झाल्या, त्यांखालीं साक्षी पडल्या कीं झालं लग्न ! म्हटलं भोलाराम मास्तरांचीच साक्ष घेऊं नोंदणीपत्रावर म्हणजे ठीक ! पण आज त्यांचाच पत्ता नाहीं ! काय करावं ?

**भोला०** : ( सिंधूसह येतो व सिंधूला आंत जाण्यास सांगतो. ती सुलभेसह आंत जाते. ) काय बाबासाहेब, माझी आठवण केलीत ? कां बरं ?

**माधव०** : कांहीं विशेष नाहीं. पण आतां इथंच थोडा वेळ रहा म्हणजे झालं ! आज आमच्याकडे शुभ कार्य आहे !

**भोला०** : होय, कळली आहे ती भानगड मला थोडीथोडी ! पण...

**माधव०** : अहो, तें शुभकार्य आहे, भानगड नव्हे !

**भोला०** : नाहीं म्हटलं हे चटपटे—भानगड गल्लींतले वकील—आहेत इथं, म्हणून मी त्याला भानगड म्हटलं इतकंच ! बरं, मी जरा आंत जाऊन येतों. ( पुट० ) सर्व भानगड सुलभेला सांगून ठेवली पाहिजे आधीं !

**चटपटे** : काय हो, पण असे पुटपुटतां काय मनांतल्या मनांत ?

**माधव०** : त्यांच्याकडे काय लक्ष देतां तुम्ही ? त्यांना ती संवयच आहे पुटपुटण्याची ! ( भोलाराम गेल्यावर ) काय हो, वाजले किती ?

**चटपटे०** : सहा वाजायला आले. त्या साहेबांची झालीच वेळ यायची ! ( पाहून ) हो, हे आलेच ! ( नोंदणीदार येतो. ) या साहेब, या असे. नमस्कार ! या—

**माधव०**: बसा असे मध्यभागीं मुख्य आसनावर ! भैरू, हार आण आणि सुलभला बाहेर बोलाव–( भैरू येतो–सुलभहि येते. )

**सुलभा** : नमस्कार नोंदणीसाहेब ! पण बाबासाहेब, साक्षीदार कुठं आहेत ? त्यांचीच वाट पहात्यें आहें मी. मास्तर म्हणाले, ते अत्तां येतील इतक्यांत ! थोडं थांबलं तर बिघडेल का ?

**चटपटे** : म्हटलं तर बिघडेल म्हटलं तर नाहीं ! शिवाय, ते आपले मास्तर.... मास्तर, अहो भोलाराम मास्तर, या बाहेर. ( भोलाराम येतो. ) बसा इथं !

**सुलभाः** पण थोडे थांबा अजून! हे झाले तुमचे साक्षीदार. माझ्या बाजूचे साक्षीदार यायला नकोत का?

**चटपटे** : आतां कसल्या बाजू घेऊन बसलांत? तूं नि मी आतां लौकरच एका बाजूचीं होणार!

**सुलभा** : तें खरं, पण थोडं थांबलं तर?

**चटपटे** : कांहीं तरी भानगड दिसते आहे खास! आतां कसं करावं?

**भोला०** : ( पुट० ) आतां नाक मुठींत धरावं नि पलायन करावं!

**चटपटे** : पुटपुटतां कशाला? मला भारी चीड आहे तुमच्या या पुटपुटण्याची!

**भोला०** : पण मला त्याची आवड आहे ना?

**सुलभा** : ( पाहून ) हं, नको आतां थांबायला! माझे साक्षीदार आलेच! ( सुहास येतो त्यास ) या, साक्षीदार, या. बसा असे.

**चटपटे** : ( आश्चर्यानें ) कोण, सुहास? चोर? आणि याची साक्ष माझ्या लग्नाच्या नोंदणीपत्रकावर? सुहास, तूं कां इथं आलास?

**सुहास** : सुलभनं बोलावलं म्हणून!

**माधव०** : पण तूं इथं आलास कसा? चोरीच्या आरोपावरून तुला शिक्षा नाहीं झाली?

**सुहास** : नाहीं; मी निर्दोषी म्हणून सन्मानानं सुटलों. झेण्डे वकिलांनीं मला योग्य न्याय मिळावा म्हणून कमालीची चिकाटी दाखविली. पोलिसांनींसुद्धां सत्याचीच बाजू उचलून धरली. साक्षीदारांच्या साक्षींनीं तर पुराव्याचे नुसते फुटाणेच उडाले! शेवटीं गुंडोपंतांची बोबडी वळली. असो, देवाच्या दयेनं झालं हें एकंदरींत ठीक झालं, सत्याचा जय झाला! कोर्टानं मला निर्दोषी म्हणून सोडून देतांच सर्वांनीं माझं मनःपूर्वक अभिनन्दन केलं.

**सुलभा** : चटपटे, तुम्हीहि करा सुहासांचं अभिनंदन! एका धाडसी समाज-सेवकाला न्याय मिळाला ही आनंदाचीच गोष्ट नाहीं का? मास्तर, जा बरं, सर्वांना बाहेर घेऊन या. त्यांनाहि या आनंदांत सामील होऊं द्या. ( भोलाराम

जातो आणि मथुअक्का, राधाबाई, सिन्धु, भैरू या सर्वांना बाहेर आणून बसवतो. )

**राधा०** : ( सुहासजवळ येऊन ) सुहास, देव तुमचं कल्याण करो ! ( कानशिलांवर बोटें मोडते. ) सुहास, त्या कोर्टांत मला इतका धीटपणा कुठून आला होता कोण जाणे ! मी तिथं लाजल्यें नाहीं कीं भ्याल्यें नाहीं पण आतां मात्र माझी बोबडी वळायची वेळ आली आहे. तुम्हाला माझ्यामुळं इतका अपमान सहन करावा लागला. ( कण्ठ दाटून येतो. ) सुहास, मी तुमची कशी क्षमा मागूं ? या सर्वांच्या देखत मी तुमचे पाय धरूं का ? ( खालीं वाकूं लागते. )

**सुहास** : ( तिला अडवीत ) हें काय राधाबाई, तुम्ही मला मातुःश्रीसारख्या आहांत. तुम्हीच मला आपला आशीर्वाद द्या. आम्हां समाजसेवकांना दोन दणके देतांना किंवा दोन तडाखे खातांना मुळींच दुःख होत नाहीं. समाजाची सेवा करतांना जो आमचा अपमान होतो तो आम्हांला सन्मानासारखाच वाटतो.

**सिंधु** : सुहास, तुम्ही माझ्या आईला आई म्हटलंत, तेव्हां मी तुमची पाठची बहीणच झाल्यें, नव्हे का ? मीं तुम्हांला ओंवाळण्याचं पूर्वीच ठरविलं आहे. लक्ष्मीनारायणांना ओंवाळीन असं मीं चावडीवर म्हटलं होतं, आहे का भैरोबा, तुमच्या ध्यानांत ?

**भैरू** : त्यें मी कसं इसरेन सिन्धुताई ? पुन् आदी नारायनाला लक्षुमी तर मिळूं द्या, मग वंवाळा.

**चटपटे** : रावबहादुर, हें सारं काय चाललं आहे इथं ? म्हणजे हा तमाशा पाह्यला का तुम्हीं मला इथं नोंदणीदारसाहेबांना आणायला सांगितलंत ? हा तमाशा...

**सुलभा** : हा तमाशा नव्हे चटपटे ! हा अभिनंदनाचा जलसा ! तुम्हीहि करा कीं सुहासांचं अभिनंदन ! तुम्ही सद्गृहस्थ आहांत आणि खरे सद्गृहस्थ असल्या शुभ प्रसंगीं आपण होऊन अभिनंदन करीत असतात. निदान माझ्या आग्रहास्तव तरी यांचं अभिनंदन करून मनाचा थोरपणा दाखवा.

**चटपटे :** तुझ्यासाठीं, सुलभ, तुझ्यासाठीं मी वाटेल तें करायला सिद्ध आहें. ज्यांत तुला आनंद, त्यांत मलाहि आनंद झालाच पाहिजे. ( सुहासचा हात धरून त्याशीं हस्तांदोलन करीत ) कॉंग्रॅट्स्, सुहास, कॉंग्रॅट्स्!

**सुलभा :** बाबासाहेब, सुहासांचं अभिनंदन करावं, त्यांना शुभाशीर्वाद द्यावा असं तुम्हांला नाहीं का वाटत ?

**माधव० :** वाटतं, पण ही वेळ निराळी आहे. या अभिनंदनाच्या वर्षावानं, मीं इथं ज्या हेतूनं साहेबांना बोलावलं तो हेतु वाहून जाईल कीं काय अशी मला भीति वाटते. सुलभा, हे साहेब इथं कां आले आहेत तें विसरलीस कीं काय ?

**सुलभा :** तें मी कसं विसरेन ? हे साहेब माझं लग्न नोंदण्यासाठीं आले आहेत. साहेब, नोंदा आमचं लग्न. मी तयार आहें.

**नोंद० :** यस्, व्हेरी गुड ! ( नोंदणीबुक टेबलावर पसरून ) नवऱ्यानं इथं उभं रहावं ! यस् हिअर ! ( जागा दाखवतो, चटपटे पुढें होतो. )

**सुलभा :** ( त्याला अडवीत ) तुम्ही जरा मागं उभे रहा आणि दुरून गंमत पहा. तुम्हांला साक्ष घालण्याकरितां लौकरच बोलावण्यांत येईल. तूर्त तुम्ही दूर उभे रहा. ( त्याला दूर उभी करते. )

**भोला० :** ( पुट० ) अरे हट् भंगड्या ! दूर, दूर, दूर उभा रहा !

**चट० :** ( चिडून ) मास्तर, हें पुटपुटणं आतां बंद करा, नाहीं तर....

**भोला० :** नाहीं तर काय रे ? भंगड्या, अरे हट् ! दूर, दूर...

**चट० :** रावबहादुर, तुम्ही तरी कांहीं बोला, असे मुग्ध का ? माझा अपमान....

**माधव० :** पोरी, काय मांडलं आहेस तूं हें ? एकाच क्षणानंतर हे तुझे पतिराज होणार आहेत. त्यांचा अपमान...

**सुलभा :** एका क्षणानंतर, होय ना बाबासाहेब ? पण या एका क्षणांत जो चमत्कार होणार आहे तो...

**माधव० :** कसला चमत्कार ? काय चमत्कारिक बोलत्ये आहेस हें ?

**सुलभा :** बाबासाहेब, एक क्षणभरच स्वस्थ बसाल तर नाहीं का चालणार ? सुहास, तुम्ही या असे पुढं आणि नोंदणीदारांनीं दाखविलेल्या जागेवर उभे रहा ! ( त्याला पुढें ओढते. )

**सुहास :** सुलभ, मी नाहीं समजलों हें काय गौडबंगाल आहे तें.

**सुलभा :** समजायला त्यांत कठीण कांहींच नाहीं ! अगदीं सुलभ आहे हें माझ्याच नांवासारखं ! बाबासाहेब, मला तुम्ही शिक्षण दिलंत, ज्ञानामृत पाजलंत, लहानाची मोठी केलीत, सज्ञान केलीत, माझं हित कळण्याइतकी मी मोठी झाल्यें, अत्यंत नम्रपणानंच मी जाहीर करत्यें कीं, या सुहासनांच मी वरणार आहें. हेच नवरदेव !

**चटपटे :** आणि मग मी ? मी कोण ?

**भोला॰ :** अरे हट् ! भंगड्या...जरा बाजूला ये म्हणजे सांगतों.

**चटपटे :** सांग, सुलभ ! मग मी कोण ?

**सुलभा :** सांगत्यें, थोडं धीरानं घ्या !

**भैरू :** तूं व्हय् ? टिनपाट ! अन ह्यो हिरा—

**माधव॰ :** पोरी, मला हा तुझा विचार मान्य नाहीं. नोंदणीदार साहेब, मी हिचा पिता आहें, हिची पतीची निवड मला मान्य नाहीं ! माझा विरोध—

**नोंद्णी॰ :** तुमचा विरोध तुमच्यापाशींच ठेवा. मुलगी सज्ञान आहे, कायद्यानें तिला स्वतःचा जोडीदार निवडण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे. मला तिचाच विचार विचारांत घेतला पाहिजे. तुम्ही रावबहादुर, शहाणे, समाजसुधारक, धुरीण, तुम्ही लग्नासारख्या पवित्र गोष्टींत मुलीवर आपला अधिकार गाजवतां कामा नये. रावबहादुर, तुम्ही स्वस्थ बसा आतां. ( माधवराव कपाळावर हात मारून घेतो. ) सुहास, तुम्ही आणखी पुढें या.

**चट॰ :** पण—पण—( गडबड करूं लागतो. )

**नोंद्णी॰ :** तुम्ही वकील, कायद्याचे आधारस्तंभ, तुमची गडबड लाजिरवाणी आहे. तुम्ही थोडा वेळ गप्प बसा आणि गंमत पहा.

**चटपटे :** मी कसा गप्प बसूं ? सुलभनं मलाच वरण्याचं कबूल केलं होतं !

**नोंद्णी॰ :** केलं होतं ! आतां ती कबूल नाहीं ना ? सज्ञान मुलींना लग्नाआधीं विचारपूर्वक विचार बदलण्याचा कायद्यानं अधिकारच दिलेला आहे. या वेळीं ती जो आपला पक्का विचार प्रकट करील तोच मला ध्यानांत घेतला पाहिजे.

**चटपटे** : अहो पण साहेब, हिनं इतक्या लोकांच्या देखत माझं नाक कापलं, त्याचं काय ? सुलभ, अखेरचा निर्णय देण्यापूर्वी मला सांग, या भणंग भगवानापेक्षां माझ्यांत काय कमी आहे ?

**सुलभा** : सुहास भगंण असले तरी भगवान् आहेत. आणि तुम्ही—

**चटपट** : हो मी ! माझ्यांत काय कमी आहे ? बोल, माझ्यांत काय कमी आहे ?

**रंगू** : [ प्रवेशून ] मी सांगत्यें, तुमच्यांत सभ्यपणाच तेवढा कमी आहे.

**चटपटे** : तूं कोण ?

**रंगू** : मी कोण ? विसरलांत इतक्यांत ? त्या गुण्डोपन्ताच्या मार्फत जिच्याशीं तुम्ही स्नेहसंबंध जोडलात ती मी—रंगू नायकीण ! आपल्या अपवित्र स्पर्शानं या देवतेला भ्रष्ट करूं नका. मीच ठीक होत्यें तुम्हांला ! पण आतां तीहि आशा ठेवूं नका. मला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे. तुमच्यासारख्याची संगत मला पुरती भोंवली ! मी राधाबाईचं भरलं घर बुडवायला निघाल्यें होतें. आतां माझे डोळे उघडले आहेत. मी तें लाचारीचं जिणं सोडलं आहे. कलेची—गायनकलेची सेवा करून मी पोट भरीन आणि तें नच भरलं तर दोन भजनं गाऊन देवाच्या नांवावर भिक्षा मागेन. चटपटे, या इकडे, आपण दोघंहि अपवित्र, आपण थोडीं दूरच उभीं राहूं !

**चट०** : रावबहादुर, मला तुमचं उत्तर हवं आहे. मला या साऱ्यांची बडबड ऐकून किळस आला आहे. तुमचं उत्तर...

**माधव०** : माझं उत्तर तरी दुसरं काय असणार ? मी तुमच्या वरच्या तुकतुकीला भाळून जो होकार दिला होता, त्याचा मी आतां नकार करतों. इतक्या गोष्टी स्पष्टपणें डोळ्यांना दिसल्यावर मी मुलीला तुम्हांला वरण्याबद्दल कोणत्या तोंडानं सांगूं ? आमच्या साहेबाचं नेहेमीं मला सांगणं असे कीं, ‘ Better late than never ! ’ उशिरां डोळे उघडले तरी तें भाग्याचंच लक्षण समजलं पाहिजे.

**चटपटे** : बरं आहे, काढीन याचा वचपा केव्हां तरी ! ( निर्लज्जपणानें ) मी जातों, नमस्ते, मण्डळी, नमस्ते !

**रंगू** : पण जरा आस्ते ! उभे रहा मुकाट्यानं. इथला पवित्र लग्नसमारंभ पाहून पवित्र होण्याची सुसंधि आली आहे, ती कां व्यर्थ दवडतां ? (दटावून) रहा उभे ! (तो थबकतो.)

**सुहास** : अहो, पण या सगळ्या भानगडींत माझा विचार काय ठरला तें मला कोणीच कसं विचारीत नाहीं ?

**सुलभा** : तें मी विचारत्यें. (हात जोडून) सुहास, आपला हात देऊन आपण मला कां बरं धन्य करीत नाहीं ? माझी विनंती...

**सुहास** : अग पण मी असा फटिंग, समाजाची सेवा करणारा, दोन धक्के खाणारा आणि देणारा, माझ्या जीवनाच्या धकाधकीच्या मामल्यांत...

**सुलभा** : मी तुम्हांला जन्माची साथ देईन. तुमच्या ग्रामोद्धाराच्या कामांत तुम्हाला वकिलाची सदा गरज असतेच. मी वकिलीण होऊन...

**सुहास** : पण तूं वकिलीण व्हायला मी वकील असलों पाहिजे ना ?

**सुलभा** : मला वकिलाची बायको होऊन वकिलीणबाई म्हणून नाहीं मिरवायचं ! बी. ए. झाल्यावर मीच वकिलीची परीक्षा देणार आहें. तुमच्या ग्रामोद्धाराच्या कामांत भाग घेण्याचं मीहि ठरविलं आहे. समाजसुधारक रावबहादुर माधवराव संतोषे यांच्या मुलीला हेंच जीवन शोभा देईल. खरं ना बाबासाहेब ?

**माधव०** : होय बाळ ! माझं नांव गाजविण्याचं काम तुलाच करावं लागणार आहे. तूंच माझी मुलगी आणि तूंच माझा मुलगा ! सुहास, माझ्या मुलीचा धर्मपत्नी म्हणून स्वीकार करून मला धन्य करा. तसं न कराल तर हे साहेब हात हालवीत परत जावं लागल्यामुळं रागावतील ! साहेबांचा विरस न व्हावा आणि साहेबी थाटानं करण्याचं योजलेलं मंगल कार्य सरस रीतीनं पार पडावं म्हणून माझी विनंती मान्य करा.

**सुलभा** : पण आई, तूं कां बोलत नाहींस ?

**मथु०** : बाळ, मी आणखी काय बोलूं ? मी जुन्या काळची पतिनिष्ठ बायको ! इकडच्या हाताला हात लावायचा एवढंच मला कळतं. सुहास, तुम्ही माझ्या

बाळीला पदरांत घ्या. यापेक्षां माझ्यानं अधिक बोलवत नाहीं. माझं हृदय आनंदानं भरून आलं आहे. होय म्हणा.

**सिंधु :** सुहासदादा, होय म्हण म्हणजे लक्ष्मीनारायणांना ओंवाळण्याचा माझा हृद्दहि पुरा होईल !

**सुहास :** मग मीं ब्रह्मचारी राहूनच ग्रामोद्धाराचं कार्य करायचं ठरविलं आहे त्याचं कसं होणार ? खेडेगांवांतून कामें करणाऱ्या सेवकांची गांठ नेहमीं गुण्डांशीं पडते आणि जीव सदा धोक्यांत असतो...

**गुंडो० :** ( पोलिसांसह येऊन ) खरं आहे सुहासचं म्हणणं. या प्रत्यक्ष गुण्डोपंताशींच गांठ पडल्यामुळें तुमचे प्राण धोक्यांत आले होते. मी तुम्हाला शरण आहें, मला मरण देऊं नका. तुम्हीं मला क्षमा केलीत अशी या जमादारसाहेबांची खातरजमा करून द्या.

**सुहास :** ही काय आहे नवी भानगड ? आणि गुंडोपंत, तुम्ही सदा भडकलेले असावयाचे ते आज थण्ड कसे पडलांत एकाएकीं ?

**जमा० :** न्यायाधिशांनीं निकालपत्रांत, गुंडोपंतांनीं तुमच्यावर खोटी फिर्याद गुदरल्याबद्दल तुम्हांला त्यांच्यावरच उलट फिर्याद करण्याची परवानगी दिली आहे. त्या निकालानंच गुंडोपंत थण्ड पडले आहेत.

**सुहास :** मी नाहीं कुणावर फिर्याद करीत ! गुण्डोपंत, तुम्हांला कृतकर्माचा पश्चात्ताप झाल्यामुळें मीच उलट धन्यवाद देतों तुम्हांला. मुळींच कसलीहि काळजी करूं नका.

**नोंद० :** पण मला उशीर होत आहे त्याची कांहीं काळजी ?

**माधव० :** हें बरं नव्हे ! साहेबांचा एकेक क्षण म्हणजे मोलाचा ! सुहास, व्हा पुढं !

**सुहास :** पण माझ्या ब्रह्मचर्याच्या निर्धाराचं मीं काय करूं ?

**भोला० :** तो निर्धार तुमच्या जवळच ठेवा. शिवाय, आमच्या हिंदुधर्मशास्त्राप्रमाणं तुम्हांला सुलभशीं लग्न लावल्यामुळं ब्रह्मचर्यव्रताचा भंग होण्याची भीतीच वाटावयास नको.

**माधव० :** म्हणजे म्हणतां काय तुम्ही हें मास्तर ?

**भोला०** : ब्रह्मचर्याच्या खोट्या बढायांचा आमच्या धर्मानं निषेधच केला आहे. एकपत्नीव्रत हेंच खरं श्रेष्ठ प्रतीचं ब्रह्मचर्यपालन होय हें श्रीरामचंद्रांनीं स्वतःच्या उज्वल चरित्रानें दाखवून दिलेलं असतांना, आपण त्यांच्या उपासकांनीं संशयग्रस्त असावं हें लांछनास्पद नव्हे का? सुहास, सोडा ब्रह्मचर्याचा बहाणा आणि मुकाट्यानं श्रीरामचंद्राचं पवित्र स्मरण करून करा त्या नोंदणीपत्रकावर स्वाक्षरी! सीतामाई, तूंहि स्वाक्षरी कर.

**सुहास** : गुरुजी, तुम्ही जुन्या काळचे पंतोजी असलांत तरी मानानं श्रेष्ठ आहांत. तुमच्या उपदेशापुढं मान वांकविणं माझं कर्तव्यच होय. ( पुढें होऊन सही करतो. सुलभहि सही करते. )

**नोंद०** : चटपटे वकील, या पुढें आणि इथें साक्ष घाला! तुमची साक्ष फार महत्त्वाची होईल!

**चटपटे** : काय मी?

**रंगू** : हो तुम्ही! व्हा पुढें.

**माधव०** : चटपटे, साहेब एवढं सांगतात तरी विचार करीत बसतां? साहेब बोलले, त्यांत सर्व आलं!

**चटपटे** : बरं बुवा! नाक मुठींत धरून इथं वागल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. नाहीं तर ही रंगू...

**रंगू** : पुरे झाले तुमचे रंगढंग! व्हा पुढं! सारा जन्म भानगडींत घालविलांत, आतां घडूं द्या एखादं सत्कृत्य हातून! ( चटपटे साक्ष घालतो.)

**नोंद०** : भोलाराम, आतां तुम्हीहि साक्ष घाला. ( भोलाराम येऊं लागतो. )

**भोला०** : ( चटपट्याजवळ थांबून त्याच्या पाठीवर शाबासकी देत ) धन्यवाद!

**चटपटे** : ( चिडक्या स्वरानें ) अरे हट्ट!

**भोला०** : छट्! आतां हें कशाला हट्? आपण आतां मित्र झालों. मित्र-राष्ट्रांत बेबनाव काय कामाचा?

**चटपटे** : बरं बुवा! आम्ही आपटलों, तुमचा विजय झाला!

**भोला० :** ( साक्ष घालून झाल्यावर ) सुहास, सुलभ ! करा आतां बाबासाहेबांना नि आईसाहेबांना नमस्कार आणि घ्या त्यांचे आशीर्वाद ! ( दोघे नमस्कार करतात. सुलभा आईला मिठी मारते.)

**सुहास :** बाबासाहेब, अशा शुभकालीं आपल्या आशीर्वादाची मला फार आवश्यकता आहे. मीं अंगिकारलेलं ग्रामोद्धाराचं कार्य फार कठीण आहे. गांवगुंडांच्या भानगडींत लक्ष घालून दलितांची सेवा करणं महाकर्म कठीण आहे. योग्यांनाहि अगम्य अशा सेवाव्रताचं कंकण मी बांधलं आहे. शहरांतून कामें करतांना अनेकांची मदत मिळते पण खेडेगांवांत तसं नाहीं. गुंडांच्या पायाखालीं सारा गांव दबलेला असतो. तिथं सेवकाच्या साहाय्यार्थ कोण धांवून येणार ?

**जमा० :** आम्हीं, नवीन पिढींतले, शिकलेले आणि सेवाधर्माची जाणीव असलेले समाजरक्षक !

**सुहास :** मी आपला फार आभारी आहें. बाबासाहेब, मला तुमचा आशीर्वाद मिळाला म्हणजे पुढचं पाऊल टाकायला अधिक धैर्य येईल.

[ राग–भैरवी–ताल–धुमाळी ]

**नित घडो स्वजनसेवा । गमे सुख त्यांत,**
**रमे मन शांत । पुण्य परम ठेवा ॥ ध्रु० ॥**
**सेवाधर्मचि श्रेष्ठ मानिला । योगिजनातें**
**जो प्रिय झाला । सुलभा कृति नच**
**साधायाला । मंगल आशी द्यावा ॥ १ ॥**

**माधव० :** सुहास, तुमचा सदा विजय असो ! मला मुलगा नसल्यामुळें आणि माझी एकुलती एक मुलगी तुमची पत्नी झाल्यामुळें तुम्हीच मला पुत्राच्या ठिकाणीं झालां आहांत ! मीं वाढवलेला सारा पसारा तुमचाच झाला आहे असं समजा.

**चट० :** ( पुटपुटत ) चैन झाली बेट्याची नि काय ? पाहुणा म्हणून आला नि घरींच ठाण मांडून बसला.

**भोला०** : आतां तुम्ही पुटपुटूं लागलां का ? माझा गुण तुम्ही उचलला वाटतं ?

**चट०** : चालायचंच ! ' पुष्पसंगें मातीस वास लागे ! ' दुसरं काय ?

**माधव०** : मित्रहो, चला आतां लग्नाच्या मेजवानीला ! योजलेलं कार्य पार पडलं नि साहेबांचीहि खेप फुकट गेली नाहीं. आतां कशाला उशीर ? चला मेजवानीला ! साहेब...

**नोंदणी०** : रावबहादुर, हें लग्न तुम्हां सर्वांच्या दृष्टीनं पक्कं झालं असलं तरी कायद्याच्या सूक्ष्म दृष्टीनं तें नोटिशीच्या म्हणजे वाङ्‌निश्चयाच्या स्वरूपाचें आहे. पंधरा दिवसांनीं मला तें पुन्हां पक्कें करून घ्यावें लागेल. सुलभच्या लग्नासंबंधांत ज्या ज्या भानगडी निर्माण झाल्या त्या मला कळल्यामुळें मीं अगोदर बोलून तुमचा विरस केला नाहीं. पंधरा दिवसांनीं मी पुनः येथें येऊन तें पक्कें करीन. तरीहि पंधरा दिवसांत मध्यंतरीं कांहीं नव्या भानगडी निर्माण झाल्यास...

**भोला०** : आतां भानगडीची भीतीच नको, कारण आमचे भानगडभाई चटपटे यांनींच या लग्नावर शिक्कामोर्तब केलं आहे.

**नोंदणी०** : आणि तेवढ्याचसाठीं जें प्रथम बोलायचं तें आतां बोलतों आहें. असो, झाल्या गोष्टी ठीकच झाल्या आणि पंधरा दिवसांनीं या लग्नाला कायद्यानेंहि पक्केपणा आणतां येईलच. आजच्या पुरता मी दुसरा मार्ग सुचवितों. रावबहादुरांनीं सुलभचा हात सुहासच्या हातांत द्यावा नि एकमेकांना पुष्पहार अर्पण करावयास सांगावें.

**माधव०** : अरेच्या ! तें मी विसरलोंच ! भैरू, हार आण—( हातांत हात देतात व वधूवर पुष्पहार घालतात. ) साहेब, हा पुष्पहार तुम्हांला—( हार घालतो. ) झालं लग्न—चला मेजवानीला—

**राधा०** : म्हणजे, अग्गबाई ! संपला का लग्नसमारंभ ? होमहवन नाहीं, देवाब्राह्मणांचे आशीर्वाद नाहींत...

**सिंधु** : ताशे वाजंत्रीं नाहींत...

**राधा०** : आणि वऱ्हाड्यांची पाठवणी नाहीं!

**भैरू** : त्ये नाय चालायचं! धनीसाब, तुम्ही या सायबाला दक्षणा द्या नाय तर द्येऊ नका, पुन् मस्नी लाल कांटाचं ध्वातार आन् डोकसीला लाल मुंडासं इवंच पगा!

**माधव०** : तूं कां घाबरतोस भैरू? तुला, राधाबाईना, सिन्धूला, सर्वांना—लग्नाचे अहेर करणारच आहें मी. आतां राहतां राहिला देवाब्राह्मणांचा आशीर्वाद! देवाचं काम साहेबांनीं केलंच आहे, भटजींचं काम भोलाराम करतील. त्यांची योग्यता फार थोर आहे. सुहास, सुलभ, करा महर्षि भोला-रामांना नमस्कार—(तसं करतात.)

**भोला०** : सुहास, तुम्ही लोकोत्तर समाजसेवक व्हा. मुली, अष्टपुत्रा सौभाग्यवती भव!

**सुहास** : (हंसून) अष्टपुत्रा?

**भोला०** : हो, अष्टपुत्रा! कां? घाबरलांतसे?—रावबहादुरांच्या नातवण्डांना कांहीं कमी पडणार नाहीं! तुम्हांला आठ वीरपुत्र होवोत! आमच्या दुबळ्या समाजाला धट्टयाकट्टया वीरपुत्रांची फार गरज आहे.

**माधव०** : झालं ना सगळं नीट? चला आतां मेजवानीला भीमसेन शांतिसदनांत!

**राधा०** : इश्श! खाणावळींत? घरांत नाहीं का व्हायचा सैंपाक? मेला सैंपाक—सैंपाक तो काय? मथुअक्का, तुम्ही सर्वांना लिंबाचं सरबत तयार करून देईपर्यंत मी उरकत्यें शंभर पानांचा सैंपाक! मी म्हटलं खेडेगांवची बाई आहें, शहरांतली नाजूक मैना नव्हे! (पदर बांधते.)

**माधव०** : पण साहेबी थाटांत सुरू झालेला लग्नसमारंभ साहेबी थाटांतच पार पडला पाहिजे. शिवाय, नोंदणीदार साहेबांना तितका वेळ कुठं आहे? निघतांना फोन केला कीं, भीमसेन शांतिसदनांत पोंचेपर्यंत ताटें थाटलेलीं दिसतील! चला!

**सिन्धु** : पण वऱ्हाड रस्त्यानं जायचं म्हणजे वाजंत्रीं नकोत का बरोबर?

**माधव०** : तूं आहेस  कीं सुरेल सनई बरोबर ?

**सिन्धु** : अस्सं ? ठीक तर ! चला पाहुणे मंडळी !

[ राग–सिंधभैरवी, ताल–धुमाळी ]

**चला हो चटचटा उचला पदा ।**
**सुदिन आला, सरलि विपदा ॥ ध्रु० ॥**
**चालुनि आला घरीं पाहुणा । नवरदेव कीं**
**राजसराणा ॥ सुखी तयां करिं**
**रुक्मिणीरमणा । विनति करुं**
**मुदें प्रभुच्या पदा ॥ १ ॥**

**—पडदा—**

**समाप्त**